


# जन्मशताब्दी

२००४ - २००५ स्मृती सौरभ १७

# सर्वांसाठी गीता

## एक जीवनग्रंथ

### भाग-५



- प्रा. द. ना. दुभाषी

## ।। आशीर्वाद ।।



प. पू. श्री. अदृश्य काडसिद्धेश्वर स्वामीजी
सिद्धगिरी मठ, कणेरी

।। वंदे श्री सिद्धराम - काडसिद्धेश्वराभ्याम् ।।

# सर्वांसाठी गीता : एक जीवनग्रंथ

## भाग - ५ (अध्याय १६ ते १८)

प्रा. द. ना. दुभाषी

मुद्रण :
देविका आर्ट प्रिंटर्स

मुखपृष्ठ :
माधव लाड

मुद्रित शोधन
श्री. ज्ञानेश्वर भालेकर

अक्षरजुळणी :
ओंकार कॉम्प्युटर्स, डोंबिवली

आवृत्ती पहिली :
मार्च २००५

मूल्य : 45

प्रकाशक




सिद्धगिरी गुरुकुल फाऊंडेशन
कणेरी, कोल्हापूर

## प्रस्तावना

भगवान श्रीकृष्णाने अर्जुनाचे निमित्त करून जगाला सांगितलेली व भगवान व्यासांनी श्लोकबद्ध केलेली श्रीमद्‌भगवद्‌गीता हे जगातील आश्चर्यांपैकी एक आश्चर्य आहे. प्रा. द. ना. दुभाषी यांनी सहृदय अन्तःकरणाने ते आश्चर्य सर्वांनाच आपले वाटेल व दुरावा नाहीसा होईल अशा रीतीने त्यावर भाष्य केले आहे. प्रा. दुभाषी यांनी लेखमालेच्या स्वरूपात लिहिलेले हे भाष्य अनेकांना खूप आवडल्यामुळे ते त्यात आवश्यक ती भर घालून ग्रंथस्वरूपात प्रसिद्ध होत आहे. जनताजनार्दनाने दिलेली पोच सर्वांत मोलाची असते.

शरद ऋतूतील पूर्णचंद्राकडे जसे सर्व रसिक आकृष्ट होतात त्याप्रमाणे गीतेकडे सर्व सात्त्विक विचारवन्त आकर्षित होतात. दैनंदिन मानवी जीवनातील समस्यांचे भान ठेवून त्यांची व्यवहार, धर्म, नीती व अध्यात्म या चारही स्तरांवरील सोडवण या अद्‌भुत ग्रंथामध्ये आहे. युद्धातून बाहेर जाण्याचा अर्जुनाचा मोह १) व्यावहारिक दृष्टीने अकीर्तिकर आहे. २) 'मारला गेलास तर स्वर्ग लाभेल' हा धर्मशास्त्राचा निर्णय आहे. ३) युद्धनीतीच्या क्षात्रवृत्तीला ते शोभणारे नाही. ४) 'योगस्थ राहून संग सोडून कर्म कर' हा आध्यात्मिक उपदेश आहे. लेखकाने चारही स्तरांना चांगला न्याय दिला आहे.

गीतेची महाभारताची पार्श्वभूमी लक्षात घेऊन लेखकाने कामक्रोधादिकांचे प्रतिनिधी असलेले कौरव आणि दैवीसंपदेचे प्रतिनिधी असलेले पांडव यांच्या संघर्षाचे चित्र उभे केले आहे. 'जीवन हे कुरुक्षेत्र असून त्याचे धर्मक्षेत्र करण्यात पुरुषार्थ आहे,' हे वाक्य अंतःकरणाला भिडणारे आहे.

भगवान श्रीकृष्ण व त्याचा परमस्नेहीभक्त अर्जुन यांचे अवीट गोड चरित्र प्रारंभी सांगून औचित्य साधले आहे. सत्त्वगुण जेव्हा व्यक्तीचे 'हृदय ढिले' करतो व धर्म-अधर्माच्या संभ्रमाचे विष जेव्हा त्याच्या अंतःकरणात भिनते तेव्हा अर्जुनासारख्या 'नरशार्दूला'शी युद्ध करण्याची हिंमत दुर्योधनासारख्या 'कोल्ह्याला'ही होते. महान पराक्रमाला विवेकाची जोड नसेल तर तोही व्यर्थ ठरण्याची शक्यता असते. अविवेकाला पराक्रमाची साथ असेल तर त्याचाही विजय होण्याचा धोका असतो. उदा. दुर्योधनाचा पक्ष कितीही अन्यायाचा असला तरी त्याला भीष्म, द्रोण व कर्णासारख्या अतिमानुष योद्ध्यांची साथ होती. एकूण ईश्वराच्या राज्यात अन्यायाला पराक्रमाची साथ मिळू शकते! म्हणून न्यायाच्या पक्षानेही प्रचंड सामर्थ्य कमाविले पाहिजे. देवावर भार घालून भागत नाही.

गीतेच्या स्वरूपाची खरी ओळख प्रत्येक अध्यायाच्या शेवटी येणाऱ्या समाप्तीमध्ये आहे. 'श्रीमत् भगवत्गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यांयां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुन संवादे' असे समाप्तीचे शब्द आहेत. गीतेला शास्त्रामध्ये स्मृती म्हटले आहे. कारण भगवान श्रीकृष्णाने रणांगणावर केलेल्या उपदेशाला भगवान व्यासांनी छंदबद्ध केले आहे. असे असले तरी गीतेला उपनिषदांचे मूल्य आहे. उपनिषदांप्रमाणेच ब्रह्मविद्या हा गीतेचा प्रमुख विषय आहे. ब्रह्मविद्येच्या अनुभवासाठी कर्म, भक्ती, ध्यान व ज्ञान अशा चारही योगांच्या शास्त्रांच्या अभ्यासाची जरूर आहे. क्षराक्षर विभाग, गुणत्तम विभाग इत्यादी योग पूरक आहेत.

हा संवाद कोणा सामान्य व्यक्तींमधील नसून जगद्गुरू भगवान श्रीकृष्ण व अधिकारसंपन्न शिष्य अर्जुन यांच्यातील असल्याने तो संवाद परम श्रद्धेय आहे, हा विचार लेखकाने जागोजागी मांडला आहे.

'जीवो जीवस्य जीवनम्' या गीतेतील सिद्धान्ताचा दोन प्रकारे अर्थ करता येतो. जगण्यासाठी एक जीव दुसऱ्या जीवाला खातो हा पहिला अर्थ असून एक जीव जीवनासाठी दुसऱ्यावर अवलंबून असतो, हा दुसरा अर्थ आहे. कोणताही अर्थ स्वीकारला तरी जीवन संघर्षमय असते हे त्याचे तात्पर्य आहे. ही ईश्वरी व्यवस्था असल्याने अनिवार्य आहे. या संघर्षमय जगात एका व्यक्तीने ज्या तत्त्वज्ञानाच्या आधाराने जगून आपले ऐहिक व पारलौकिक कल्याण साधावे ते तत्त्वज्ञान गीतेत मांडले आहे. प्रारब्ध प्रतिकूल असेल तर सृष्टीच्या झंझावातात (उदा. महायुद्धे, दंगे इ.) किंवा निसर्गाच्या तडाख्यात (उदा. धरणीकंप, वादळे इ.) जीव सापडतो व कदाचित कोणत्याच कल्याणाची संधी न मिळता त्याचे जीवन संपते. पण त्याने त्या दिशेने जे थोडेफार प्रयत्न केले असतील त्यांचे फळ म्हणून त्याला पुढील जन्मात अनुकूलता मिळते. या आश्वासनावर निर्भर राहून व्यक्तीने निष्काम कर्म, निष्काम उपासना, ध्यान व ज्ञान यांची कास धरून आपले जीवन उत्साहाने व आनंदाने जगावे.

ग्रंथाचे परीक्षण किंवा रसग्रहण करणे हा प्रस्तावनेचा हेतू नाही. लेखकाने आरंभलेल्या यज्ञात एक समिधा अर्पावी एवढ्या माफक हेतूने चार शब्द लिहिले आहेत. या यज्ञाचा प्रसाद वाचक व साधकांनी भरभरून ग्रहण करावा, ही भगवान श्रीकृष्ण चरणी प्रार्थना.

**– डॉ. श्रीकृष्ण देशमुख**
मुरगूड, कोल्हापूर

## ।। ग्रंथदान ।।

**शतेषु जायते शूरः सहस्त्रेषु च पण्डितः ।**
**वक्ता दशसहस्त्रेषु दाता भवती वा न वा ।।**

वरील सुभाषितात म्हटल्याप्रमाणे, दाता भेटण ही खरोखरच फार दुर्मिळ बाब आहे. एका सत्पुरुषाने दात्याला साक्षात देवाची उपमा दिली आहे, ते म्हणतात, "देव व दाता यात अंतर ते कोणते?"

परंतु जगद्गुरु काडसिद्धेश्वर महाराजांच्या आशीर्वादातून व प.पू. अदृश्य काडसिद्धेश्वर महाराजांच्या आचरणरुपी प्रेरणेतून एखादा दाता नावारुपाला येण यात विशेष ते काय! पाठीवर कृपा करणारा हात असेल तर पुढे जाण्यात वेगळीच मजा असते.

श्री. धोंडीराम सुर्वे यांनी या पुस्तकासाठी अर्थदान करुन गुरुमाऊलीची कृपा संपादन केली आहे. म्हणून त्यानंतर सर्वांसाठी गीता एक जीवनग्रंथ भाग - ५ हे १७वे ग्रंथपुष्प त्यांच्यातर्फे गुरुचरणी अर्पण!

प्रकाशक
सिद्धगिरी गुरुकुल फाऊन्डेशन
कणेरी, कोल्हापूर

## अनुक्रमणिका



# अध्याय सोळावा
# दैवासुरसंपद्विभागयोग

पंधराव्या अध्यायात, मानवी जीवनाच्या परिपूर्णतेचे संपूर्ण शास्त्र भगवंतांनी उलगडून दाखविले. 'पुरुषोत्तम'ची उच्च स्थिती सांगितली. 'पुरुषोत्तमयोगा'त प्रवेश झाल्यावर जीवनाची पूर्णता होते. त्याच्याखेरीज काहीही नाही. प्रकृतीच्या विविधरूपी अनेकतेच्या पसाऱ्यात सर्वत्र तोच भरून उरला आहे याची अनुभूती घेऊन त्या दिव्यानंदात जगणे हीच जीवनाची कृतकृत्यता - ही गुह्यतम गोष्ट भगवंतांनी सांगितली.

ही 'पुरुषोत्तमयोगा'ची परमदशा प्राप्त करून घेण्यासाठी अंतर्बाह्य पूर्ण परिवर्तन घडणे अपरिहार्य आहे. शुद्ध अंतःकरणातच ज्ञान, भक्ती विराजते. अंतःकरण म्हणजे चित्त, मन, बुद्धी, अहं हे शुद्ध होण्यासाठी दैवी गुणांची जोपासना झाली पाहिजे. अशा शुद्ध चित्तवृत्तीत ज्ञानाचा उदय होतो. ज्ञान प्राप्त झाले म्हणजे देहात्मकता जाऊन आत्मभान प्राप्त होते. आत्मज्ञान हृदयात प्रतिष्ठित झाल्यानंतर तिथे शांतीचा, प्रसन्नतेचा अंकुर फुटतो. हे सर्व प्राप्त करण्यासाठी जी जी साधना आपल्या हातून घडते, त्यातून आपल्या चित्तवृत्तीत किती व कोणते बदल झाले, किती सद्‌गुण अंगी बाणले, जन्मजन्मान्तरींच्या वासनांच्या जळमटांचा किती निचरा झाला हे सर्व तपासण्यासाठी सोळाव्या अध्यायाची मांडणी गीतेत झाली आहे. आत्मपरीक्षण घडविण्यासाठी भगवंतांनी हा अध्याय सांगितला आहे. परमार्थात आपले परीक्षक आपण स्वतः व भगवंत हे दोघेच असू शकतात. आत्मोन्नतीच्या कोणत्या टप्प्यावर आपण आहोत याचे परीक्षण आपणच केले पाहिजे. या अध्यायात २६ दैवी गुण सांगितले आहेत. त्याबरोबर आसुरी गुणही सांगितले आहेत. यांतील कोणत्या गुणांनी आपली वृत्ती, स्वभाव स्थिर झाला आहे याचे परीक्षण प्रत्येक टप्प्यावर सजगतेने व्हावे ही भगवंताची साधकांकडून अपेक्षा आहे. वृत्तीत सतत ऊर्ध्वगामी बदल हेच भक्तीत अपेक्षित आहे. या दैवी गुणांच्या विरुद्ध ज्या वृत्ती आहेत त्यांना आसुरी वृत्ती असे म्हटले आहे.

भगवंतांनी गीतेत ह्या दैवी गुणांच्या विषयी पुनःपुन्हा सांगितले आहे. पुरुषोत्तम होण्यासाठी हे सर्व गुण भक्ताच्या वृत्तीतून, कृतीतून प्रगट झाले पाहिजेत. दुसऱ्या अध्यायात स्थितप्रज्ञाचे गुण सूत्ररूपाने सांगितले तेच या सोळाव्या अध्यायात अधिक विस्ताराने सांगितले. सातव्या अध्यायाच्या १५ व्या श्लोकात ''न मां दुष्कृतिनो मूढाः प्रपद्यन्ते नराधमाः...'' या श्लोकात भगवंत म्हणतात की, ''मायेने ज्यांचे ज्ञान नष्ट केले, ते मूढ व दुष्कर्मी नराधम आसुरी बुद्धीत पडून मला शरण येत नाहीत.'' या श्लोकात आसुरी संपत्तीचे संकेतरूपाने वर्णन केले आहे. त्याच अध्यायाच्या १६ व्या श्लोकात भगवंतांनी सांगितले आहे की, ''सुकृतिनः मां भजन्ते''... ''पुण्यवान लोक म्हणजे दैवी गुणांनी संपन्न असलेले भक्त माझी भक्ती करीत असतात.'' नवव्या अध्यायाच्या १२ व्या श्लोकात ''राक्षसीमासुरीं चैव प्रकृतिं मोहिनीं श्रिताः'' या पंक्तीतून मोहात्मक आसुरी व राक्षसी स्वभावाचे वर्णन केले आहे. तर १३ व्या श्लोकात दैवी स्वभाव धारण करणाऱ्या महात्म्यांचे वर्णन केले आहे. बाराव्या अध्यायात ''अद्वेष्टा सर्वभूतानां...'' या १३ व्या श्लोकापासून १९ व्या श्लोकापर्यंत, एकूण ३६ दैवी गुणांचे वर्णन भगवंतांनी केले आहे. ही ३६ गुणांची कुंडली जमल्याशिवाय भक्त व भगवंत यांचे आध्यात्मिक लग्न (SPIRITUAL MARRAGE) होऊ शकत नाही. पुन्हा तेराव्या अध्यायात, ''अमानित्वं...'' या ७ व्या श्लोकापासून ११ व्या श्लोकापर्यंत ज्ञानाची एकूण २० लक्षणे सांगितली. हे २० दैवी गुण जेव्हा भक्ताच्या अंगी दृढ होतात तेव्हाच त्याला ज्ञान प्राप्त होते. चौदाव्या अध्यायात अर्जुनाने गुणातीताची लक्षणे विचारली. तेव्हा भगवंतांनी २२ व्या श्लोकापासून २६ व्या श्लोकापर्यंत गुणातीत पुरुषाची लक्षणे व आचार कसा असतो याचे उत्तर दिले. पंधराव्या अध्यायातदेखील तिसऱ्या श्लोकात ''असंगशस्त्रेण दृढेन छित्वा...'' या पदातून आसुरी संपत्तीला कारणीभूत असणाऱ्या प्रापंचिक आसक्तीच्या त्यागातून प्रगटणाऱ्या दैवी संपत्तीचा उल्लेख केला.

आता भगवंत सोळाव्या अध्यायात याच दैवी व आसुरी गुणांचे विस्तारपूर्वक वर्णन करीत आहेत -

श्री भगवान उवाच,

**अभयं सत्त्वसंशुद्धिर्ज्ञानयोगव्यवस्थितिः ।**
**दानं दमश्च यज्ञश्च स्वाध्यायस्तप आर्जवम् ।।१।।**
**अहिंसा सत्यमक्रोधस्त्यागः शांतिरपैशुनम् ।**
**दया भूतेष्वलोलुप्त्वं मार्दवं ह्रीरचापलम् ।।२।।**



**तेजः क्षमा धृतिः शौचमद्रोहो नातिमानिता ।**
**भवन्ति संपदं दैवीमभिजातस्य भारत ।।३।।**

''निर्भयता; अंतःकरणाची पूर्ण शुद्ध सात्त्विक वृत्ती; तत्त्वज्ञान समजून घेऊन त्यानुसार प्रत्यक्ष आचरणातील दृढता; सत्पात्री दान; इंद्रियनिग्रह; यज्ञ करणे; वेदशास्त्रादिकांचा अभ्यास; स्वधर्मपालनासाठी कष्ट सोसणे; वृत्तीतील सरळपणा.'' ।।१।।

''कोणत्याही प्राण्यास काया, वाचा व मनाने दुःख न देणे; यथार्थ व प्रिय, सत्य भाषण; अपकार करणाऱ्यावरसुद्धा न रागावणे; कर्मफळाचा त्याग किंवा कर्तेपणाच्या अभिमानाचा त्याग; अंतःकरणात शांती; निंदा व चहाडी न करणे; सर्वभूतमात्राविषयी निर्हेतुक, हितकारी मंगलभाव असणे; विषयांच्या सान्निध्यात राहूनही निर्विकार व निर्विषय राहणे; कोमलपणा; शास्त्रविरुद्ध आचरण करण्याची लाज वाटणे; विनाकारण हालचाली न करणे.'' ।।२।।

''तेजस्विता; क्षमा; धैर्य; अंतर्बाह्य शुद्धी; कोणाचेही वाईट न चिंतिणे; स्वतःच्या मोठेपणाचा फाजील अभिमान नसणे; ही सर्व हे अर्जुना! दैवी संपत्ती प्राप्त असलेल्या पुरुषांची लक्षणे होत.'' ।।३।।

वरील तीन श्लोकांत भगवंतांनी २६ दैवी गुणांचे वर्णन केले आहे. दैवी संपत्ती म्हणजे ज्ञानप्रकाशक सामग्री! 'दैवी' हा शब्द 'दिव्' म्हणजे 'प्रकाशणे' या मूळ धातूपासून झाला आहे. ज्ञान प्रकाशित होईल अशी सामग्री ज्याच्याजवळ आहे तो दैवी संपत्तिवान! भगवंतांनी सृष्टी निर्माण करून जेव्हा मनुष्याची उत्पत्ती केली तेव्हा त्याच्यात दैवी व आसुरी ह्या दोन्ही प्रवृत्तींची व्यवस्था केली. भद्र-अभद्र, सत्-असत, प्रकाश-अंधार, देव-दानव, राम-रावण अशा द्वंद्वांनी मानवी मन निर्माण केले. महाभारतातील कुरुक्षेत्राप्रमाणे मानवी अंतःकरणातही एक कुरुक्षेत्रच चालत आहे. विषय-विकार, द्वेष, मत्सर, क्रोध इ. आसुरी गुणांच्या रूपाने कौरव सेना; तर दया, अहिंसा, प्रेम, मांगल्य अशा दैवी गुणांच्या रूपाने पांडवसेना एकमेकांसमोर अंतःकरणात उभी ठाकली आहे. जो संघर्ष, झगडा मनात असतो त्याचा प्रभाव प्रत्यक्ष जीवनातही पडतो. संत तुकारामांनी सार्थ शब्दांत हेच सांगितले,

**रात्रीदिवस आम्हां युद्धाचा प्रसंग ।**
**अंतर्बाह्य जग आणि मन ।।**

मनुष्याच्या अंतःकरणात शुभ-अशुभ याचा संघर्ष सतत चालू असतो. कृष्णही आत आणि कंसही आत! रामाची संस्कृती व रावणाची संस्कृती यांचे अस्तित्व एकाच ठिकाणी. तेव्हा आपले जीवन अधोगतीत जाण्यापासून

वाचविण्यासाठी या २६ गुणांना आत्मसात करून 'नरा'चा 'नारायण' व्हायचे. ''कृष्णो भूत्वा कृष्णं यजेत्'', ''शिवो भूत्वा शिवं यजेत्''... कृष्ण होऊन कृष्णाची पूजा, शिव होऊन शिवाची पूजा करण्याचे सामर्थ्य मनुष्याला भगवंतांनी प्रदान केले आहे. म्हणूनच गीतेने पुनःपुन्हा या दैवी गुणांचा उच्चार केला आहे. हे दैवी गुण माणसाला दिव्यत्वापर्यंत नेतात.

ह्या २६ गुणांत 'अभय' व 'सत्त्वसंशुद्धिः' हे दोन गुण म्हणजे सर्व गुणांचे सार होय. २६ गुणरूपी मंदिराचे हे दोन प्रमुख खांब. या दोन गुणांवरच तर सर्व गुणांची मदार! त्यातून 'अभय' (निर्भयता) या पहिल्या गुणाचे स्थान एखाद्या सेनापती–नायकासारखे आहे.

निर्भयता आली तरच इतर गुणांची वाढ होते. भीतीच्या छायेत सतत वावरणाऱ्या दुबळ्या माणसाच्या अंगी सद्‌गुणांची वाढ होत नाही. सद्‌गुण जरी असले तरीही भीतीने पछाडलेली माणसे सत्याला सामोरे जाऊ शकत नाहीत. त्यांचे सद्‌गुणसुद्धा प्रसंगी दुर्गुण ठरतात. प्रखर ईश्वरनिष्ठा व शरणागतता असेल तर निर्भयता येते. ईश्वरनिष्ठा म्हणजे ईश्वर आहेच असा पक्का दृढविश्वास! तोच ईश्वर माझे सर्वथैव रक्षण करील म्हणून त्यालाच सर्व कर्मे अर्पण करणे... आणि ''ठेविले अनंते तैसेचि राहावे'' अशी जीवनधारणा म्हणजे शरणागतता. ईश्वराच्या कृपेच्या छायेत निर्भयता प्राप्त होते. ईश्वराला शरण जाऊन समर्पित जीवन जगणाऱ्यांना भय कोणाचे?... गीतेचे तत्त्वज्ञान माणसाला भयमुक्त करते. देहाची नश्वरता, आत्म्याची अमरता, सुख-आनंद यांचे नेमके ठिकाण आणि विषयवस्तू व भोगवस्तूंची क्षणभंगुरता हे समजल्यास माणूस अनासक्त होतो आणि निर्भयतेने जीवन जगतो. जीवनाकडे समत्वदृष्टीने पाहायला लागल्यानंतर निर्भयता मनात येते. जो माणूस निर्भय आहे तोच निश्चिंत होतो. निश्चिंत व शांत झाला तरच त्याला प्रसन्नता, सुख प्राप्त होते. भय चिंता निर्माण करते. चिंता आली की तणाव, निराशा, मानसिक असंतुलन येते. यामुळे माणूस दुःखी होतो. सत्ता, संपत्ती, पद, प्रतिष्ठा, कीर्ती या सर्व गोष्टी माणसात भय निर्माण करतात. सत्ता प्राप्त झाली तरी ती टिकेल की नाही यासाठी भीती; धन प्राप्त झाले तरी ते कोणी हिरावून घेणार नाही ना या आशंकेने भीती; मिळालेले पद, प्रतिष्ठा, कीर्ती टिकविण्यासाठी धडपड व त्याला डाग लागेल म्हणून भीती. कोणत्या कारणांमुळे माणूस भयभीत होईल याला अंत नाही. मृत्यूच्या केवळ स्मरणानेसुद्धा माणूस अशांत, भयभीत होतो. कोठूनही भय निर्माण झाले तरी परिणाम तोच... दुःख, अशांती!



म्हणून निर्भयता ही पहिली संपत्ती आहे. ही दैवी संपत्ती जीवनात आली की; तणाव, निराशा, आवेग, चिंता हे निघून जातात. अभय आले की, शांती व प्रसन्नता येते. वेदांत एक प्रार्थना आहे. ''मित्रादभयम् अमित्रादभयम्'' ''हे भगवंता, मला माझ्या मित्रांकडूनसुद्धा अभय दे व शत्रूकडूनसुद्धा निर्भयता दे.'' ''अभयं नवत्तम् अभयं दिवा - सर्वाआशा मम मित्रं भवन्तु ।'' ''रात्रीमध्ये मी निर्भय राहीन व दिवसासुद्धा निर्भय राहीन. ज्या दिशांना मी जाईन ते सर्व माझे मित्र होवोत.'' आजचा मित्र दैववशात् उद्या शत्रू जर झाला तर तो अधिक धोकादायक असतो म्हणून मित्रांपासूनसुद्धा अभय मागितले आहे. भय कधी अंतःकरणात निर्माण होते तर कधी बाहेरच्या परिस्थितीने अंतःकरण भयभीत होते. दोन्हीही परिस्थितीत माणूस हतबल व निराश होतो. ही दारुण नैराश्यता अनेक मानसिक विकार निर्माण करते. त्याचे मानसिक संतुलन ढळते. योगदर्शनात पाच क्लेश सांगितले आहेत. ''अविद्या-अस्मिता-राग-द्वेष-अभिनिवेशाः इति पञ्च क्लेशः'' - अभिनिवेश म्हणजे मृत्यूची भीती. वास्तविक प्रत्येक क्षण हा आपल्याला मृत्यूकडे नेत असतो. पंचमहाभूतांचे हे शरीर क्षणभंगुर आहे. जोपर्यंत या मृण्मय शरीरात तो चिन्मय आहे तोपर्यंत या मातीच्या खेळण्याचे सर्व व्यवहार! माशी पंख फडफडायला जेवढा वेळ घेते किंवा डोळ्याची पापणी वरून खाली यायला जेवढा वेळ लागतो तेवढ्या वेळेत या शरीराला मृत्यू येऊ शकतो. पण हे वास्तव चित्र आपण लक्षात घेत नाही. यक्षाने युधिष्ठिराला प्रश्न केला की या जगात सर्वांत मोठे आश्चर्य कोणते आहे? तेव्हा युधिष्ठिराने उत्तर दिले, ''प्रत्येक जण दुसऱ्याचा मृत्यू पाहत असतो पण तो मृत्यू आपल्यालाही स्वीकारावा लागेल, याचे त्याला स्मरणही होत नाही. यापेक्षा वेगळे आश्चर्य कोणते?'' भयाच्या छायेखाली जगणे म्हणजे प्रत्येक क्षणी मरणे व भयमुक्त होऊन जगणे म्हणजे जगण्यातला आनंद घेणे आहे. जो सतत भयभीत असतो त्याला जगही भिववीत असते. भयग्रस्त मनुष्याच्या हातून कोणतेच भरीव काम होत नाही.

जोपर्यंत आसक्ती आहे तोपर्यंत भय आहे. ज्या ज्या वस्तूवर आपला प्राण जडला आहे त्या त्या वस्तूच्या वियोगाची भीती आपल्याला सतत छळत असते. मग ते घर असो किंवा घरातील व्यक्ती असोत. एखादी प्राणप्रिय वस्तू असो किंवा दृश्य न दिसणारी कीर्ती, मान, प्रतिष्ठा असो. संभावीताना अपकीर्ती ही मरणाहून अधिक वेदनादायक असते. अशा वस्तू माणसाला सतत भीतीच्या आवरणाखाली ठेवत असतात. त्यातून मुक्तता नसते.

रविदास नावाचे एक थोर संत होऊन गेले. काशीत राहत होते. ज्या झोपडीत ते राहत होते ती झोपडी त्यांना खूप आवडायची. एक दिवस त्या

झोपडीला आग लागली व जळून भस्मसात झाली. लोकांना वाटले की, साधूंना आता खूप दुःख झाले असेल. पण प्रत्यक्षात चित्र वेगळे होते. लोकांनी पाहिले की रविदास त्या झोपडीकडे पाहून हसत होते. लोकांनी कुतूहलाने त्याचे कारण विचारले. तेव्हा साधू म्हणाले, ‘‘भगवंतांनी झोपडी दिली. आसरा दिला होता. त्याच्या छायेत मी विसावलो होतो. पण त्याच भगवंतांनी ही झोपडी अशी भस्मसात केली. यातून भगवंताला मला हे समजावयाचे आहे की, या झोपडीप्रमाणेच हे शरीरसुद्धा असेच होणार आहे. त्यामुळे त्याचा मोह धरू नकोस. झोपडीरूपी हे शरीरच जळत आहे असे मला वाटले. म्हणून मोहरहित होऊन मी हसत आहे.’’

ज्याचा मोह गेला त्याची भीतीही गेली. आपल्या संस्कृतीत चार आश्रमांची व्यवस्था आहे. त्यातील वानप्रस्थाश्रमात मनुष्याने हा मोह सोडून भगवंताच्या सान्निध्यात राहावे असा संकेत आहे. वृद्धावस्थेत या सर्व नात्यागोत्यांचा, वस्तूंचा, सत्ता, पद यांचा त्याग करून मोह-निरास व्हावे व भगवंताचे चिंतन करावे असा त्यात भाव आहे. कारण सर्व काही आपल्यापासून दूर जाऊ शकेल पण केवळ भगवंतच आपली साथ देऊ शकेल. भगवंत काल होता, आज आहे, उद्याही असेल. तोच आपला खरा पिता असल्याने खरे प्रेम तेथेच असले पाहिजे. ते प्रेम प्राप्त झाले की, मग भीती कशाची व कोणाची?

वस्तूवरचे प्रेम मनुष्याला अभय देत नाही. एकदा एक संत आपल्या शिष्यांसमवेत चालले होते. वाटेतच त्यांना मुक्काम करावा लागला. तेव्हा काही धनवान व्यक्ती गुरूंच्या दर्शनासाठी आल्या व त्यांनी धन देण्याची इच्छा केली, पण गुरूंनी ते स्वीकारण्यास नकार दिला. परंतु एका शिष्याने ती भेट स्वीकारली. सोन्याची ती एक वीट होती. दुसऱ्या दिवशी वनातून जाताना रात्र झाली. गुरू म्हणाले, ‘‘येथेच मुक्काम करू. धुनी पेटवून सुंदर भजन करू.’’ हे ऐकल्यावर तो शिष्य बिथरला, भीतीने ग्रस्त झाला. आपण कोणत्या तरी वस्तीवर जाऊ असे त्याने सुचविले. त्याच्या मनात दरोडेखोरांची भीती होती. त्या गुरूने हे ओळखले. गुरू म्हणाले, ‘‘हे बघ, तुझ्या झोळीत तुला भीती वाटण्यासारखे काहीतरी तू ठेवले आहेस. ते काढ व समोरच्या तलावातील पाण्यात फेकून दे.’’ शिष्य पुन्हा बिथरला. पण तेवढ्यात गुरूने ती झोळी हातात घेतली व खोल पाण्यात फेकून दिली. शिष्याच्या मानेवर बसलेले भीतीचे भूत निघून गेले. तो निश्चिंत व शांत झाला. आनंदाने भजन सुरू झाले. गुरूने हसत हसत विचारले की, आपण आता वस्तीवर जायचे का? शिष्य म्हणाला की, आता कशाला कुठे जायचे? ज्या वस्तूच्या चोरीबद्दल भय होते ती वस्तूच निघून गेल्यामुळे आता भीती कशाची? आता आपण येथेच भजन करू.



म्हणून जितका जास्त वस्तुसंग्रह करू तेवढे अधिक आपण भयभीत होऊ. जादा धन हे भीतीला कारण, दुःखाला निमित्त व चिंतेचे साधन! म्हणून निवांत, निश्चिंत, शांत होण्यासाठी अभयता जीवनात आली पाहिजे. निर्भयता ही खरी दैवी संपत्ती आहे. शक्तिशाली विचार, ज्ञान, सत्संग व भगवंताला संपूर्ण शरणागत होऊन केलेली भक्ती हीच मनुष्याच्या जीवनात निर्भयता निर्माण करते. २६ गुणांत या गुणाला भगवंतांनी प्रथम स्थान दिले आहे.

‘सत्त्वसंशुद्धिः’ हा दुसरा गुण परमार्थाचा पाया आहे. अंतःकरणाची अंतर्बाह्य शुद्धता झाली की, दिव्य विचारांनी व शुभ चिंतनाने माणसाचे आचरण पवित्र व शुद्ध होते. शुद्ध चित्तात ज्ञान प्रगटते. ‘‘केवळ ईश्वरप्राप्ती हाच जीवनाचा उद्देश आहे,’’ हा निश्चय जेव्हा दृढ होतो तेव्हा प्रपंचाविषयीची आसक्ती कमी व्हायला लागते. त्यामुळे चित्तातील मल, विक्षेप, आवरण हे दोष नाहीसे होतात. शुद्ध अंतःकरणात भगवंताचा निवास असतो. सारी सृष्टी भगवंतमय दिसायला लागते. संयम, निष्ठा, समर्पित भावना, पश्चात्ताप, क्षमा अशा गुणांची जोपासना केल्यास अंतःकरण निर्मळ होते.

‘ज्ञानयोगव्यवस्थितिः’ ही तिसरी संपदा. परमात्म-तत्त्वाचा यथार्थ बोध म्हणजे ज्ञान आणि परमात्म्याशी जोडले जाणे म्हणजे योग. भगवंताशी जोडले गेल्याने जीवनात समत्व येते. मान-अपमान, सुख-दुःख, निंदा-स्तुती अशी द्वंद्वे निघून जातात.

‘दान’ हा चौथा गुण! दातृत्व हा स्वभाव बनला पाहिजे. निसर्ग जसा भरभरून देत असतो तसेच माणसानेही दिले पाहिजे. पण हे दान सत्पात्री असावे. देश, काल, परिस्थिती पाहून योग्य त्या ठिकाणी, निरपेक्ष भावनेने व अनुपकरणीय वृत्तीने केलेले दान सत्पात्री दान समजले जाते. भगवंतांनी प्रत्येकाला काहीना काही कौशल्य, सामर्थ्य, योग्यता, संपत्ती दिली आहे. ते भगवंताचे समजून व आपण केवळ विश्वस्त किंवा निमित्तमात्र मानून, त्यातून इतर जीवांनाही दान करणे ही भगवंताला आवडणारी भक्ती आहे.

‘दम’ म्हणजे इंद्रियांना नियंत्रित, संयमित करून शास्त्रसंमत विषयांचे सेवन करणे. स्वार्थ, अभिमान, कर्तृत्वभाव टाकून अनासक्त वृत्तीने असे भोग घेणे म्हणजे संयमित जीवन जगणे. इंद्रियलोलुपता, आसक्ती इ. मुळे माणूस पशुतुल्य व शास्त्रनिषिद्ध जीवन जगतो. ‘दम’रूपी हे आत्मनियंत्रण व अनुशासन जीवनात उतरले की, निःस्वार्थता, कर्तव्यतत्परता, तेज अशा गुणांनी जीवन संपन्न होते.

त्यानंतर 'यज्ञ' हा दैवी गुण सांगितला आहे. आमची संस्कृती यज्ञ-संस्कृती आहे. यज्ञ, हवन, अग्निहोत्र केवळ व्यक्तीसाठी नसून समष्टीसाठी होते. संपूर्ण विश्वाच्या कल्याणासाठी यज्ञ-व्यवस्था होती. गीतेने या यज्ञाची व्याप्ती अधिक वाढविली आहे. परिस्थितीनुसार वाट्याला आलेले कर्तव्यकर्म निःस्पृह, निरहंकारी बनून, प्रभुप्रीत्यर्थ व विश्वकल्याणासाठी करणे हा यज्ञच आहे. एवढेच नव्हे तर प्रत्येक कर्म, जीवनातील सर्व व्यापार, तप, दान, भोग सर्व काही भगवत्प्रीत्यर्थ करणे म्हणजे यज्ञच होय. स्वधर्माचे निष्ठेने आचरण म्हणजेच यज्ञ!

'स्वाध्याय' म्हणजे 'स्व'चे अध्ययन आणि तसेच उत्तम ज्ञानप्रदायक ग्रंथांचे पठन-पाठन! गुरुकुलातून ज्या वेळी आपले अध्ययन संपवून शिष्यगण बाहेर पडत, त्या वेळी गुरू शेवटचा संदेश देताना त्यांना उपदेश करीत, ''सत्यं वद । धर्मं चर । स्वाध्यायान्मा प्रमदः । स्वाध्यायप्रवचनाभ्यां न प्रमदितव्यम् ।'' स्वाध्याय जीवनाचा अविभाज्य भाग आहे. स्वाध्याय करण्यात कधीही आळस करू नका व स्वाध्याय चुकवू नका,'' असा उपदेश गुरू शिष्यांना करीत. द्रष्टा ऋषींनी व अवतारी पुरुषांनी निर्माण केलेली ग्रंथसंपदा हा आपल्या स्वाध्यायाचा विषय झाला पाहिजे. वेद, उपनिषदे, सूत्रग्रंथ, नीतिग्रंथ, पुराणे, संतांची ग्रंथसंपदा यांच्या अध्ययनाने जीवन दैवी बनते. सामर्थ्यशाली विचार मनुष्याला उन्नत बनवितात. आपले शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी, अहंकार... अशा आतील सर्व गोष्टी समजून घेणे म्हणजे स्वाध्याय करणे होय. ''जे पिंडी ते ब्रह्मांडी'' या न्यायाने या देहातच सर्व ब्रह्मांड सामावले आहे. या 'स्व'स्वरूपाचे ज्ञान होण्यासाठी अंतर्मुख होऊन अभ्यास करणे म्हणजे स्वाध्याय!

'तप' हा दैवी गुण जीवनात दिव्यत्व आणतो. ''तपो द्वंद्वसहनम्'' - सहनशक्ती अपार केली पाहिजे. म्हणजे जीवनात येणारी संकटे, सुख-दुःख, सर्दी-गर्मी, भूक-तहान, शीत-उष्ण अशी द्वंद्वे सहन करण्याची शक्ती निर्माण होते. अत्यंत प्रसन्नतेने, तक्रार न करता जीवनात येणाऱ्या संकटांना सामोरे जाणे हे 'तप' आहे. सर्व महापुरुषांनी कठोर तप केले. भगवान श्रीरामांनी १४ वर्षे वनवास भोगून तपाचरण केले. सर्व ऋषी-मुनी तपस्वी होते. तपातून मनुष्य आतून उजळून निघतो, जीवनाला सुगंध प्राप्त होतो.

भगवान श्रीकृष्णांनी 'आर्जवम्' हा गुण सांगितला. 'आर्जवम्' म्हणजे सरळपणा. 'अर्जुन' या शब्दाचा अर्थही सरळपणा! द्वेषरहित, स्वार्थरहित अशी वृत्ती. काया, वाचा, मनाने कपटरहित होऊन निर्झराप्रमाणे स्वच्छ असणे म्हणजे सरळपणा.



पहिल्या श्लोकात भगवंतांनी २६ पैकी ९ दैवी गुणांचे वर्णन केले.

अंतःकरण शुद्ध होण्यासाठी हे गुण वृत्तीत दृढ झाले पाहिजेत. अशी वृत्ती होऊन त्याप्रकारे आचरण होणे हीच खरी भक्ती! हे दैवी गुण मनुष्याच्या जीवनात शाश्वत सुख निर्माण करतात. शुद्ध चित्तवृत्तीत ज्ञान प्रकटते. अशा ज्ञानाने बुद्धीची स्थिरता, समत्व प्राप्त होते. ''समत्व चित्ताचे हेचि सार जाण योगाचे ।।'' संपूर्ण योगाचे सार म्हणजे चित्ताचे समत्व आहे असे ज्ञानेश्वर माऊली म्हणतात. मन व बुद्धीचे ऐक्य जिथे निर्माण होते तेथे ही स्थिरता प्राप्त होते व तेव्हाच अंतःकरणात शांतीचा उदय होतो. हीच शांती अखंड प्रसन्नतेला प्रसवते. गीतेने मानवी जीवनाची कृतार्थता, सार्थकता पुरुषोत्तम होण्यात आहे, हे पुनःपुन्हा सांगितले आहे. पुरुषोत्तम होण्यासाठी हे २६ दैवी गुण म्हणजे २६ सोपान आहेत. हे पूर्ण पार करूनच शाश्वत सुखाचे धनी होता येईल. जीवनाची कृतकृत्यता यातच आहे. हाच गीतेचा संदेश आहे.

'अहिंसा सत्यमक्रोधस्त्यागः...' येथेपासून दुसऱ्या श्लोकातील दैवी गुण सांगावयास भगवंतांनी सुरुवात केली. 'अहिंसा' हा दहावा गुण दुसऱ्या श्लोकात प्रथम क्रमांकाला आहे. 'अभय' हा २६ गुणातील प्रथम श्रेष्ठ गुण व २६ वा शेवटचा गुण नम्रता. या दोन गुणांच्या मध्ये जे २४ गुण आलेले आहेत ते बहुतांशी अहिंसेला पर्यायी असेच गुण आहेत. अहिंसा व सत्य असे दोन सारभूत गुण महात्मा गांधींनी निवडले. महात्मा गांधींनी जसा 'अनासक्ति' योग गीतेतून प्राधान्याने निवडला, तसेच सर्व दैवी गुणांचे सार म्हणून मानवी जीवनाच्या कल्याणासाठी ही दोन तत्त्वे जगाला दिली. महात्मा गांधींची गीतेवर प्रगाढ श्रद्धा होती. गीतेच्या आचरणाशिवाय माझा एकही दिवस जात नाही असे त्यांनी आपल्या आत्मचरित्रात लिहून ठेवले आहे. 'अहिंसा व सत्य' या दोन दैवी गुणांत इतर २४ गुण सामावले आहेत, इतके हे गुण सारभूत आहेत. काया, वाचा, मने कोणाचेही अहित, अनिष्ट न करणे व न चिंतणे म्हणजे अहिंसा! शस्त्राने हिंसा होते तसेच ती वाणीनेही होते. व्यंगात्मक अपशब्द बोलून दुसऱ्याला दुःख होईल असे बोलणे हीसुद्धा हिंसाच आहे. मानवी इतिहासात अहिंसेचे वेगवेगळे प्रयोग वेगवेगळ्या परिस्थितीत झाले आहेत. परशुरामाने स्वतः अहिंसक असूनही क्षत्रियांचा संहार करण्यासाठी हिंसेचा अवलंब केला. एकवीस वेळा क्षत्रियांचा संहार करूनही ते उरलेच. निःक्षत्रिय पृथ्वी करण्याचे त्याचे स्वप्न अपुरे, अयशस्वी ठरले. हिंसामय होऊन हिंसेला नाहीसे करता येत नाही. प्रभू रामचंद्रांच्या वेळी देखील सज्जनांच्या रक्षणासाठी राक्षसांचा संहार करावा लागला.

विश्वामित्राने यज्ञ व धर्मरक्षणार्थ राम-लक्ष्मणांना बोलावून राक्षसांचा, आसुरी प्रवृत्तींचा संहार केला. पुढे संतांनी आपल्या व्यक्तिगत जीवनात अहिंसेचा प्रयोग केला, पण संपूर्ण समाजाला अहिंसेचे साधन देण्यात ते दुबळे ठरले. अलीकडच्या काळात अहिंसेच्या उदात्त तत्त्वाने असहकार, सत्याग्रह या साधनांनी, देशाला स्वतंत्र करण्यासाठी महात्मा गांधींनी आत्माहुती दिली. मानवी जीवनाच्या या सर्व विकासक्रमात अहिंसेचे अनेक प्रयोग झाले. दोन महायुद्धांनंतर, २१ व्या शतकात असताना आज जगाला केवळ 'अहिंसा' या उदात्त मूल्याचीच गरज आहे. माणसाने माणसासारखे जगावे म्हणून, मांसाहार परित्याग करून शाकाहार स्वीकारावा यासाठी जगभर प्रचार-प्रसार सुरू आहे. पाच हजार वर्षांपूर्वी गीतेने अहिंसेचा जो मार्ग दाखविला त्यात याहून अधिक आध्यात्मिक मूल्य होते. आसक्तिपूर्ण व 'मी-माझे' समजून भोगवृत्तीने, स्वार्थाने सुख भोगणे ही एक प्रकारची हिंसाच आहे. पण ईश्वराचे धन समजून त्यागवृत्तीने, समर्पित भावनेने, ''सर्वभूतहिते रताः'' होऊन संयमित भोग घेणे ही अहिंसा आहे अशी गीतेची धारणा आहे.

पुढील दैवी गुण 'सत्यम्' सांगितला आहे. सत्य बोलणे हे जेवढे महत्त्वाचे तेवढे सत्याचे आचरण करून संपूर्ण जीवनच सत्यावर उभारणे हे अधिक महत्त्वाचे. सत्य हाच ईश्वर अशी बुद्धीची धारणा झाल्यानंतर, सत्याला सामोरे जाण्यासाठी लागणारे धैर्य व निर्भयता सहज येते. सत्यधर्माला जाणण्यासाठी असत्याचे सुवर्णमयी भासणारे आवरण दूर करावे ही उपनिषदांची हाक आहे. जे जे चकाकते ते ते सर्व सोने असे गृहीत धरू नये. शाश्वत सुखासाठी, जीवनातील क्षणभंगुर व क्षणिक सुख देणाऱ्या भोगविषयाप्रत अनासक्ती वाटून भगवंताबद्दल प्रेम वाटले पाहिजे. सत्याचे ज्ञान झाल्यानंतरच वैराग्य जन्मते. ''ज्ञानस्य पराकाष्ठा वैराग्यम्'' असे म्हटले आहे. जेवढी ज्ञानाची परिसीमा गाठता येते तेवढे वैराग्य धारण करता येते. मृत्यूचे सत्यस्वरूप समजले की मृत्यूची भीती वाटत नाही. जीवनाची क्षणभंगुरता ज्ञात झाली की, अपूर्व आनंदमय, सर्वेश्वर भगवंताबद्दल आकर्षण व प्रेम वाटू लागते व आपलेही स्वस्वरूप त्याच्यासारखेच आहे, हे सत्य जाणले की, अंशाचा अंशीकडे अखंड प्रवास सुरू होतो. वैराग्यातून भक्तीची वृत्ती निर्माण होते व मुक्तीचे द्वार सापडते.

'अक्रोधः' म्हणजे क्रोधरहित होणे! क्रोधाने माणूस स्वतःला विसरतो. बुद्धिनाश होऊन विवेकभ्रष्ट होतो व आत्मनाशाला कारणीभूत होतो. सर्वनाश करणारा हा क्रोध जितका संयमित केला जाईल तेवढी शांती व सुख प्राप्त होते. 'अक्रोध' जीवनात आला की, दुसऱ्याबद्दल ईर्ष्या, द्वेष, मत्सर वाटून



त्याचे अकल्याण करण्याची भावना नाहीशी होते. सूडाने माणूस पेटतो, क्रोधित होतो. कुटुंबेच्या कुटुंबे या सूडाग्नींनी नामशेष झाली आहेत. दुःखाला कारणीभूत होणारा क्रोध दूर करणे म्हणजे 'अक्रोध'. महात्मा गांधींच्या लहानपणीची एक घटना बरेच काही शिकविते. एकदा खेळता खेळता भावाने गांधीजींना मारले. त्यावर तक्रार करीत गांधीजी आपल्या आईकडे गेले. आईला म्हणाले, ''हे बघ, भावाने चूक केली आहे. त्याने मला मारले.'' यावर आई म्हणाली, ''तूही जाऊन त्याला मार. थप्पड दे.'' गांधीजींनी उत्तर दिले, ''आई, तू हे मला किती विपरीत शिकवितेस. भावाने जी चूक केली तीच पुन्हा मी करू का? तू मला असं शिकव, की मी जाऊन त्याला क्षमा करावी.'' 'अक्रोध' होण्यासाठी गांधीजींनी दाखविलेला रस्ता ही गीतेची शिकवण आहे.

'त्याग' हा दैवी गुण परमार्थात श्रेष्ठ पदाला नेणारा गुण आहे. एक दिवस सर्वस्वाचा त्याग करून हे जग सोडावेच लागते. जन्मभर सतत वस्तूंचा संग्रह करण्यात शक्ती व वेळ खर्च करायचा व हे सर्व त्याग करून निजधामाला जायचे किंवा जन्म-मृत्यूच्या रहाटगाडग्यात अडकायचे हा सृष्टिक्रम आहे. अशा या क्षणभंगुर संसाराकडे अनासक्त होऊन, त्याच्याकडे केवळ कर्तव्य म्हणून पाहायचे हा खरा त्याग आहे. अशी आतून संन्यस्त वृत्ती झाली की तो साधक परमेश्वराच्या प्रेमाला पात्र होतो. जेव्हा आसक्ती व फल सोडून, कर्तव्य म्हणूनच कर्म केले जाते, तेव्हा त्याला सात्त्विक त्याग म्हणतात (गीता १८.९). भगवंताच्या प्राप्तीची अनिवार इच्छाच मनुष्याला कामना-वासना-तृष्णा त्याग करण्यास कारण होते.

'शान्तिः' ही जीवनातील मोठी शक्ती आहे. जिथे शांती नाही तेथे सुख नाही. 'अशान्तस्य कुतः सुखम्' (गीता २.६६). जेव्हा राग-द्वेष अंतःकरणातून नाहीसे होतात तेव्हा इंद्रियांना संयमित ठेवून मनुष्याचे चित्त प्रसन्न होते. चित्त प्रसन्न झाले की सर्व दुःखांचा नाश होतो. तेव्हा बुद्धीही स्थिर होते. अशा स्थिर बुद्धीच्या ठिकाणी शांती वसते व तेथेच सुख असते. शांती जीवनाचे खरे वैभव आहे. कितीही धनवान व रूपसुंदर मनुष्याच्या जीवनात हे शांतीचे वैभव नसेल तर सारेच व्यर्थ. ही शांती बाहेरून प्राप्त होत नाही. ती आत अंतःकरणातच यावी लागते. विकार-विहीन चित्तात, विशुद्ध अंतःकरणातच शांती प्रसवते.

भगवान श्रीकृष्ण दैवी संपत्तीत 'अपैशुनम्' या गुणालाही स्थान देतात. निंदा-नालस्ती करून, दुसऱ्याचे दोष दाखवून त्याची मानहानी करणे म्हणजे 'पैशुनम्' ही वृत्ती! व ह्याचा सर्वस्वी अभाव म्हणजे 'अपैशुनम्'. काहीना

दुसऱ्याची प्रगती, संपन्नता, वैभव पाहून मनात ईर्ष्या-द्वेष निर्माण होतात. अशी माणसे स्वतः मनातून अशांत, अतृप्त असल्यामुळे निंदा करून खोटे सुख प्राप्त करतात. एखाद्या सुखी घरात जर 'पैशुनम्' वृत्तीची मन्थरा किंवा शकुनी आला, तर त्या घराचा सर्वनाश ओढवलाच म्हणायचे. कारण निंदा-चुगली यांमुळे संशय-पिशाच्च एकदा का थैमान घालू लागले की, त्या घरातील शांती, सुख पार निघून जाते. पण, जो जसे विचार प्रक्षेपित करतो तसेच ते बुमरँग होऊन त्याच्यावरच परततात. म्हणून उत्तम विचारांना थारा देऊन सर्वत्र "ईशावास्यम् इदं सर्वम्" मानून भद्र दृष्टीने जगाकडे पाहायचे. जशी दृष्टी तशी सृष्टी. ज्याने भगवंताला सर्वस्व मानले त्याला हळूहळू सृष्टीत साऱ्या गोष्टी भगवंतमय दिसायला लागतात. मग अशा साधकाच्या मनात निंदा, दुष्ट बुद्धी, वैरभाव कसा उत्पन्न होईल?

'दया भूतेषु' हा पारमार्थिक श्रेष्ठ गुण दैवी संपत्तीत येतो. दुसऱ्यांचे दुःख पाहून कळवळा येणे व ते दुःख दूर करण्याचा प्रयत्न करणे या भावनेला दया म्हणतात. पाणी जसे समोर येईल तो खड्डा भरूनच पुढे जाते, तसे समोर येणाऱ्या माणसाच्या जीवनातील दुःख दूर करूनच जो जीवन जगतो तो खरा दयावान पुरुष. "दुसऱ्याचे दुःखे दुखावे । दुसऱ्याचे सुखे सुखावे । अवघेचि सुखी असावे । ऐसी वासना ।।" असे संत रामदासांनी दयावान माणसाच्या बाबतीत म्हटले आहे. स्वकेंद्रित व स्वार्थप्रेरित जीवन हे पशुजीवन. मीही जगावे व दुसऱ्यास जगू द्यावे, ही दिव्यता आहे. जो केवळ स्वतःसाठी जगतो त्याच्या जीवनाला कधीही सुगंध प्राप्त होत नाही. पण जो निःस्वार्थबुद्धीने दुःखितांच्या, पीडितांच्या जीवनात आनंदाची पेरणी करतो त्याचे जीवन कृतार्थ होते. संत-महात्म्यांच्या ठिकाणी शुद्ध, निर्मल दया-भाव असतो. दुसऱ्यांच्या सुखासाठी काहीही त्याग करण्याची त्यांची तयारी असते.

'अलोलुप्त्वम्' म्हणजे विषय जवळ आले तरी इंद्रिये निर्विकार राहणे. लोलुपता म्हणजे दुसऱ्याचे भोग पाहता पाहता स्वतःलासुद्धा तृष्णा होणे व याचा सर्वस्वी अभाव म्हणजे अलोलुप्त्व. "न जातु कामः कामानाम् उपभोगेन शाम्यति..." हा भागवतातील ययातीच्या तोंडी असलेला श्लोक जीवनाचे अंतिम रहस्य सांगतो. विषयांच्या भोगाने कधीही तृप्ती होत नाही. तप्त अग्नीत जसे तूप ओतावे आणि अग्नी अधिक भडकावा तसे एका इच्छेतून दुसरी इच्छा जन्म घेत असते. म्हणून इंद्रियसंयम परमार्थात आवश्यक आहे.

भगवंत म्हणतात की, 'मार्दवम्' हा एक दिव्यगुण आहे. 'मार्दवम्' म्हणजे अंतःकरणाची कोमलता. भक्तीमध्ये हा गुण हळूहळू सहजपणे येतो. भक्त



सहृदयी, संवेदनशील व सरळ मनाचा असतो. त्याच्या अंतःकरणात दया व करुणेचा पाझर असतो. इतरांच्या दुःखाने तो द्रवित होतो. असे अनेक संत-महात्मे होऊन गेले की, ज्यांनी मुक्त होण्यापेक्षा लोककल्याणासाठी जीवन व्यतीत करणे अधिक पसंत केले.

'ह्रीः' हा पुढील दैवी गुण. लोकविरुद्ध व शास्त्रविरुद्ध आचरण करण्याची लाज वाटणे म्हणजे 'ह्रीः'. अशा वृत्तीमुळे साधक निंद्य कर्म बाजूस सारतो.

'अचापलम्' म्हणजे चंचलतेचा अभाव. एखाद्या कामात अवाजवी उतावळेपणा कार्यनाश घडविण्यास कारणीभूत होतो. सात्त्विक पुरुष नियोजनबद्ध होऊन, स्थिर बुद्धीने व धैर्याने आपले कार्य करतो. यश-अपयश यांची चिंता न करता व चित्तात विक्षेप व चांचल्य न आणता कार्य केल्याने तो दुःखी होत नाही.

'तेज' म्हणजे तेजस्विता. वेदांमध्ये ज्या प्रार्थना आहेत त्यात साधक भगवंताकडे तेजाचीच मागणी करतात. "तेजोऽसि तेजो मयि देहि" - "भगवंत, तू तेजस्वी आहेस. तुझ्याएवढे तेजस्वी कोणी नाही. मी तुझा अंश आहे. तेच तेज तू मला दे!" तेजस्विता प्रत्येकात सुप्तावस्थेत असते. ती जागी करावी लागते.

'क्षमा' म्हणजे सामर्थ्य असूनही इतरांचे अपराध सहन करणे व त्यांना माफ करणे. जैन-परंपरेत 'क्षमा-पर्व' साजरे केले जाते. ज्याने अपराध केला त्यालाही क्षमा करणे व आपल्या कृतीमुळे ज्यांना कष्ट सहन करावे लागले त्यांची क्षमा मागणे. हिंदू धर्मातही होळीच्या वेळी रंग उधळताना हीच अपेक्षा असते. जुने रंग विसरू व नवनव्या रंगाची आनंदाने उधळण करूया हा भाव ठेवून रंग खेळायचा. भगवान श्रीकृष्णांनी आपल्या अवतार समाप्तीच्या वेळीसुद्धा हीच लीला करून जगासमोर आदर्श ठेवला. ज्याचा बाण पायाला लागून अंतसमय आला, त्यालाही जीवदान देऊन क्षमा केली.

'धृति'सुद्धा दैवी गुण आहे. देह व इंद्रिये खचू न देणारी अंतःकरणाची विशेष वृत्ती! 'धृति' म्हणजे धैर्य! व्यक्तीच्या अंगी धैर्य, विश्वास व परमेश्वरावर दृढ श्रद्धा असेल तर तो कोणत्याही संकटाला सामोरे जातो. निर्भयाने जगणे हाच पुरुषार्थ आहे. अनुकूल अथवा प्रतिकूल अशा कोणत्याही परिस्थितीत विचलित न होणे म्हणजे धैर्य!

'शौचम्' म्हणजे अंतर्बाह्य शुद्धी! पवित्रता! शरीर, मन, बुद्धी जर पवित्र असेल तर अशा अंतःकरणात भगवंत वास करतो. ही अंतःकरणाची पवित्रता परमार्थाचा पाया आहे. सर्व काही साधना करायची ती या शुद्धतेसाठीच! अंतर्बाह्य पवित्रता माणसाला देवत्वापर्यंत नेते.

'अद्रोह' ही दैवी संपदा आहे. कोणाचेही वाईट, अशुभ न चिंतिणे म्हणजे अद्रोह! अनिष्ट करणाऱ्याच्या विरुद्धसुद्धा सूडाची भावना न ठेवता किंवा बदला घेण्याची वृत्ती न ठेवता सरळ व्यवहार करणे.

२६ वा दैवी गुण 'नातिमानिता'. स्वतःच्या मोठेपणाचा फाजील, अवास्तव अभिमान नसणे! अति मान व अति अभिमान याने मनुष्य अधोगतीस पोहोचतो. म्हणून प्रचंड फळे असून वृक्ष जसा वाकतो तशी विनम्रता मोठेपणा प्राप्त झाल्यावरसुद्धा आली पाहिजे.

हे सर्व २६ गुण दैवी संपत्ती प्राप्त झालेल्या पुरुषाची लक्षणे आहेत. भगवंताच्या बासरीच्या दिव्य ध्वनीप्रमाणे गीतेतील ही गुणसंपदा आहे. ही संजीवनी ज्याला प्राप्त होते त्याचे जीवन अमृतमय होते. असे जीवन भगवंताला आवडते. ही भगवंताची दैवी संपत्ती आहे. मनुष्याने ईश्वरावरील अनन्यभक्तीने ही संपदा प्राप्त करायची आहे.

भगवंताचा लाडका भक्त होण्यासाठी या गुणांची गरज आहे. हे गुण मनुष्याला शाश्वत सुख देतात. अंतःकरणशुद्धी हाच परमार्थाचा पाया आहे. ही चित्तशुद्धी होण्यासाठी हे दैवी गुण वृत्तीत व आचरणात आणून भगवंताजवळ जाणे यात मनुष्याच्या जीवनाची कृतार्थता आहे.

या दैवी गुणांच्या विरुद्ध वृत्ती किंवा आचरण होणे, ही आसुरी, राक्षसी संपत्ती. या अध्यायात भगवंतानी आसुरी संपत्तीचे विस्तृत वर्णन केले आहे. दैवी संपत्तीचे सारभूत वर्णन केवळ पहिल्या तीन श्लोकांत करून पुढील अठरा श्लोकांत आसुरी संपत्तीचे वर्णन केले आहे. हे संपूर्ण अधोगतीला नेणाऱ्या नरकमय जीवनाचे वर्णन आहे. प्रत्येक दैवी गुणाच्या विरुद्ध असणारे हे वर्णन आहे. या आसुरी संपत्तीपासून दूर राहण्यासाठी व मनुष्याने निदान मनुष्यासारखे जीवन जगण्यासाठी हे समजणे आवश्यक आहे, असा गीताकारांचा दृष्टिकोन आहे. आत्मपरीक्षणासाठी या अध्यायाची योजना असल्यामुळे कळत-नकळत आपल्यांत असणाऱ्या या गुण-दोषांची जाणीव सतत भक्ताला व्हावी, यासाठी हे विस्तृत वर्णन केले आहे. तमोगुणांनी भरलेल्या या आसुरी संपत्तीने केवळ अशांती, अज्ञान निर्माण होऊन जीवन दुःखमय होते. विकारांचे थैमान, दुष्ट प्रवृत्तींचा भस्मासुर व अनिष्ट, विघातक वृत्तींचा परिपोष होणारी राक्षसी संपत्ती पुढील श्लोकांत वर्णन केली आहे -

**दम्भो दर्पोऽभिमानश्च क्रोधः पारुष्यमेव च ।**
**अज्ञानं चाभिजातस्य पार्थ सम्पदमासुरीम् ।।४।।**
**दैवी सम्पद्विमोक्षाय निबन्धायासुरी मता ।**
**मा शुचः सम्पदं दैवीमभिजातोऽसि पाण्डव ।।५।।**



**द्वौ भूतसर्गौ लोकेऽस्मिन्दैव आसुर एव च ।**
**दैवो विस्तरशः प्रोक्त आसुरं पार्थ मे श्रृणु ।।६।।**
**प्रवृत्तिं च निवृत्तिं च जना न विदुरासुराः ।**
**न शौचं नापि चाचारो न सत्यं तेषु विद्यते ।।७।।**
**असत्यमप्रतिष्ठं ते जगदाहुरनीश्वरम् ।**
**अपरस्परसम्भूतं किमन्यत्कामहैतुकम् ।।८।।**

"दंभ, दर्प, अभिमान तसेच हे पार्था! क्रोध, निष्ठुरपणा आणि अज्ञान हे आसुरी म्हणजे राक्षसी संपत्तीत जन्मलेल्यास (प्राप्त होतात)." ।।४।।

"(यांपैकी) दैवी संपत्ती मोक्षदायक आणि आसुरी बंधदायक असे समजतात. हे पांडवा! तू दैवी संपत्तीत जन्मलेला आहेस. शोक करू नकोस." ।।५।।

"या लोकांत दोन प्रकारचे प्राणी उत्पन्न होत असतात. (एक) दैव आणि दुसरे आसुर. (पैकी) दैव प्रकाराचे वर्णन विस्ताराने सांगितले (आता) हे पार्था! आसुर प्रकाराचे वर्णन मी सांगतो, ऐक." ।।६।।

"प्रवृत्ती म्हणजे काय करावे आणि निवृत्ती म्हणजे काय करू नये हे आसुर लोकांस कळत नसते. त्यामुळे त्यांच्या ठिकाणी अंतर्बाह्य शुद्धी असत नाही, उत्तम आचरण असत नाही आणि सत्य भाषणही असत नाही." ।।७।।

"हे (आसुरी) लोक (म्हणतात की,) हे सर्व जग असत्य, अप्रतिष्ठ म्हणजे कसलाही नैतिक आधार नसलेले, अनीश्वर म्हणजे ईश्वरावाचून असणारे, (तसेच) एकमेकांपासून म्हणजे कोणत्याही सृष्ट्युत्पत्तिक्रमानुसार उत्पन्न झालेले नसते. (म्हणून) कामाखेरीज म्हणजे मनुष्याच्या विषयोपभोगाखेरीज सृष्टीचा दुसरा हेतू काय असणार? ।।८।।

चौथ्या श्लोकात सहा दुर्गुणांचे वर्णन आले आहे. माणूस विचारांनी बनत असतो. जसे विचार तसा आचार. ज्या वृत्तींनी त्याच्या व्यक्तित्वाची घडण झालेली असते, तसा व्यवहार त्याच्या हातून घडतो. सत्संग किंवा कुसंग हा त्याच्या वासना-विकारानुसार घडत असतो. जसे पाणी ज्या पात्रात ठेवावे तसा आकार व रंग घेते, त्याप्रमाणे आपले सारे जीवन आपल्या विचारानुसार घडत असते. सतत आत्मपरीक्षण करून, आपल्यातील कोणते आसुरी भाव-विचार आहेत, याचे भान ठेवणे व ते दूर करण्याचा विवेकाने प्रयत्न करणे हेच मनुष्यत्वाचे लक्षण आहे. दुसऱ्याच्या दुर्गुणावर-दोषावर आपण सतत टीका करीत असतो. आपले दोष मात्र दोष वाटत नसतात. हा मनुष्यस्वभाव आहे. आपले ध्यान सतत दुसऱ्यांच्या दिशेने जाते. याला कारण म्हणजे आपली सारी इंद्रिये बहिर्मुख बनविली गेलेली आहेत. केवळ आत्मचिंतन हाच आपला आरसा आहे की, ज्यात आपल्या अंतर्बाह्य विकारांचे

दर्शन घडते. आसुरी वृत्तीचे लोक बाहेरून कितीही सुंदर दिसले तरी, आंतरिक कुरूपता त्यांच्या बाह्य कृतीतून प्रगट होत असते. रावणाचे व्यक्तिमत्त्व सुंदर होते पण आसुरी वृत्तीमुळे रावण हा युगानुयुगे तिरस्करणीय ठरला आहे. राम-रावण या दोन्हींचेही अस्तित्व हृदयात आहे. त्या रावणाचा वध करून रामाची प्रतिष्ठापना करणे हे मनुष्यत्वाकडून देवत्वाकडे जाण्याचे पाथेय आहे.

ज्या गुणांनी अधःपतन घडते, त्यात पहिल्या स्थानावर 'दम्भ' आहे. दंभ म्हणजे ढोंग! मान, प्रतिष्ठा, कीर्ती इ. प्राप्त करण्यासाठी जे आपण नाही आहोत ते आहोत असे दाखविण्याचा प्रयत्न करणे म्हणजे ढोंग. भोगी असून योगी आहोत असे भासविणे, स्वार्थपरायण असून त्यागी असण्याचा आव आणणे, अज्ञानी असताना ज्ञानी म्हणून मिरविणे, दुर्वर्तनी असताना सदाचरणाचे ढोंग करणे, हे सर्व दंभाचे लक्षण आहे. दुसरा दुर्गुण 'दर्प'! गर्व किंवा घमेंड म्हणजे दर्प. सत्य, संपत्ती, पद, प्रतिष्ठा, कीर्ती, वैभव याबद्दल अनाठायी गर्व असणे म्हणजे दर्प. 'मी-माझे' या अहंभावनेने सतत सर्व कर्तृत्वाचे-भोक्तृत्वाचे श्रेय आपल्याकडे घेत ही माणसे जगत असतात. आपल्यासारखे दुसरे कोणी असता कामा नये, याबद्दल ही माणसे जागरूक असतात. 'अभिमान' हा दुर्गुण याच पंक्तीतील आहे. बाहेरील वस्तूबाबत जो गर्व असतो, तो दर्प; पण आंतरिक वस्तूबद्दल जो गर्व असतो तो अभिमान! अहंतेमुळे किंवा विद्या-बुद्धी इ.मुळे जी मोठेपणाची भावना असते, तो अभिमान. "मी मोठा विद्वान आहे, माझ्याएवढी सिद्धी कोणालाही प्राप्त झालेली नाही, माझा संप्रदाय सर्वश्रेष्ठ आहे. माझी जात, माझा धर्म जगात श्रेष्ठ आहे."... अशी वाक्ये ही या वृत्तीमुळे उद्भवतात. सद्गुणांनासुद्धा मारक ठरणारी ही वृत्ती विद्वानांनासुद्धा नामोहरम करीत असते. त्यानंतर 'क्रोध'! ज्या ठिकाणी अशांती असते, तेथे क्रोध अवतरतो. क्रोध हा माणसाचा प्रथम क्रमांकाचा शत्रू आहे. देहात राहून देहाचाही नाश करतो व दुसऱ्याचासुद्धा नाश करतो. जसे लाकडात स्थित असलेला अग्नी लाकडालाच जाळतो, त्याप्रमाणे क्रोधातून बुद्धिनाश व बुद्धिनाश झाला की सर्वनाश!... दुसऱ्यांचे अनिष्ट करण्यासाठी अंतःकरणात, जो द्वेषाग्नी सतत भडकलेला असतो, त्याचे नाव क्रोध! दुसऱ्यांच्या अहितात ज्यांचे सुख सामावलेले असते, त्यांच्या ठिकाणी याचा वास असतो. जेव्हा मनुष्याच्या स्वार्थाआड किंवा अभिमानाविरुद्ध कृती घडते, तेव्हा क्रोध निर्माण होतो. दुसऱ्या अध्यायातील ६२ व ६३ या श्लोकांमध्ये क्रोधापासून सर्वनाश कसा होतो, याचे वर्णन आले आहे. 'पारुष्यम्' म्हणजे कठोरता! अंतर्बाह्य ज्याच्या सर्व क्रिया पोलादासारख्या कठीण असतात...



नजर तीक्ष्ण, शरीराच्या हालचालीत अकडपणा, वाणीत कठोरता असे ज्याचे आविर्भाव असतात तो इतरांच्या भीतीला कारणीभूत होतो. हृदयाचा कठोरपणा एवढा की, दुसऱ्यांच्या दारुण दुःखाने तो सद्गदित होत नाही, उपकार किंवा मदत यासाठी धावून जात नाही. केवळ स्वकेंद्रित होऊन स्वतःच्या स्वार्थापलीकडे तो कशाचीही तमा बाळगत नाही. 'अज्ञान' हीसुद्धा आसुरी संपत्ती! अविवेकाचे दुसरे नाव अज्ञान! अशा अविवेकी पुरुषांना सत्-असत्, सार-असार, कर्तव्य-अकर्तव्य, विहित-अविहित, शास्त्र-अशास्त्र यांचा बोध होत नाही. श्रेय-प्रेय यांचे ज्ञान नसल्याने, ही माणसे भोगलोलुप होऊन नाशवंत पदार्थांना सर्वस्व मानत असतात. ते केवळ पशुतुल्य जीवन जगत असतात. इंद्रियजन्य सुखांना सर्वस्व मानल्याने बन्ध-मोक्ष याच्याशीही त्यांना काही कर्तव्य नसते. भगवंताने या सहा दुर्गुणांना आसुरी संपत्ती म्हटले आहे.

मी स्वरूपतः परमेश्वराचाच अंश आहे अशी ज्या जीवाची दृढ धारणा होते, तो आपल्या अंशीकडे जाण्यासाठी म्हणजे भगवत्प्राप्तीसाठी धडपडत असतो. भगवत्प्राप्तीच जीवनाचे अंतिम ध्येय असल्यामुळे सांसारिक जीवनात आसक्त राहण्याऐवजी तो सर्वच भगवंतमय समजून कर्तव्य व सेवेच्या भावनेने जगाकडे पाहत असतो. त्यामुळे अशा साधकातील दैवी संपत्ती वृद्धिंगत होत असते. तो सत्संगात राहून भगवंताच्या नाम-संकीर्तनात, लीला-गुण-चरित्र यांत रमत असतो. यज्ञ, दान, तप, तीर्थ, जप, ध्यान, स्वाध्याय, सत्संग या सर्व साधनांसह तो स्वतःच्या मुक्तीसाठी साधना करतो आणि मानवजातीच्या कल्याणासाठीही कार्यरत राहतो. पण जो अहंता, अभिमान, क्रोध अशी आसुरी संपत्तीची जोपासना करीत आहे, त्याची मुक्ती तर दूरच; पण ऐहिक जीवनसुद्धा बंधनमय व दुःखमय होते. अनंत कामना व तृष्णा घेऊन जगत असल्याने जन्म-मरणाच्या फेऱ्यात असा जीव अडकत राहतो. पण "मा शुचः" - "तू शोक करू नकोस" असे भगवंत अर्जुनाला सांगत आहेत - "कारण तुझा वंश श्रेष्ठ आहे. माता कुंती व पिता पांडु यांचा पुत्र असल्यामुळे तुझ्यात दैवी संपत्ती स्वाभाविक रूपाने आली आहे." दैवी संपत्तीने युक्त असलेल्या अशा पुरुषांनी चिंता करायचे कारण नाही, कारण भगवत्प्राप्ती हेच त्यांचे परंपरागत अंतिम ध्येय असते. ६ व्या श्लोकात भगवंतांनी या जगातील दोन प्रकारच्या प्राण्यांचा उल्लेख केला आहे - एक दैव आणि दुसरा असुर! आसुरी संपत्तीचे विस्तारपूर्वक वर्णन भगवंत करीत आहेत. काम, क्रोध, लोभ, मोह, दंभ, द्वेष हे सर्व दुर्गुण आसुरी-संपत्तीत येतात. "असुषु प्राणेषु रमन्ते इति असुराः" - जे केवळ

भोगमय जीवन जगतात ते असुर! ही दोन्ही संपत्ती सर्व प्राण्यांत आहे. दैवी संपत्तीचे प्रगटीकरण झाले की, मनातील आसुरी संपत्ती नष्ट होते. सर्व प्राण्यांत केवळ मनुष्यच आपल्या विवेक-शक्तीने आसुरी-वृत्तीचा त्याग करू शकतो. ७ व्या श्लोकापासून या आसुरी संपत्तीचे विस्तारपूर्वक वर्णन भगवंतांनी केले आहे. विहित कार्यांत प्रवृत्ती व निषिद्ध कार्यांपासून निवृत्ती याचा विवेक आसुरी वृत्तीच्या लोकांना नसतो. शास्त्रग्रंथ, गुरू, संतांचे विचार या सर्वांचा स्वीकार करून हे जाणून घ्यायचे असते. पण प्रवृत्ती व निवृत्ती यांचा विचार न केल्याने या प्रकारच्या मनुष्यांत कर्तव्य-अकर्तव्य याचा बोधच नसतो. सत्य-असत्य याबद्दलही उदासीन असल्यामुळे असत्य आचरणाचा ते आधार घेतात.

याबाबतीत दुर्योधनाचे एक वचन प्रसिद्ध आहे. तो म्हणतो -

**जानामि धर्मं न च मे प्रवृत्तिः**
**जानाम्यधर्मं न च मे निवृत्तिः ।**
**केनापि देवेन हृदि स्थितेन**
**यथा नियुक्तोऽस्मि तथा करोमि ।।**

''मला धर्म कळतो, पण त्याविषयी माझी प्रवृत्ती नाही. मला अधर्मही कळतो, पण त्यापासून मी परावृत्त होऊ शकत नाही. माझ्या हृदयात असणारा कोणतातरी देव मला जशी प्रेरणा देतो, तसे मी करतो.'' हा देव तरी कोण! हे आसुरी संस्कारच.

८ व्या श्लोकात भगवान म्हणतात की, असे लोक ईश्वराला मानीत नाहीत. हे जगत् असत्य असून केवळ 'काम' हेच जगाचे कारण आहे असे ते म्हणतात. ईश्वर, प्रारब्ध, पुनर्जन्म, आत्मा... यांचा विचार करण्याची गरजच काय? या जगाचा नियंता कोणीही नाही. स्त्री-पुरुष यांच्या संबंधामुळेच या जगाचे व्यवहार होत असतात. धर्म-अधर्म, पाप-पुण्य, सत्य-असत्य, मनुष्यधर्म अशा कोणत्याही गोष्टीवर त्यांची श्रद्धा नसते. खा-प्या-मजा करा, हाच जीवनउद्देश ठेवून हे आसुरी लोक जगत असतात.

या ८ व्या श्लोकात भगवंतांनी सृष्टीच्या उत्पत्तीच्या बाबतीत वेदान्त आणि सांख्य या दोन्ही शास्त्रांच्या सिद्धांतांची चर्चा केलेली आहे आणि म्हटले आहे की, आसुरी मनोवृत्तीचे लोक हे दोन्ही सिद्धांत मानत नाहीत. वेदान्तमताप्रमाणे परमात्माच या सृष्टीचे मूळ तत्त्व असून त्यानेच आपल्या मायाशक्तीला सृष्टीच्या रूपात प्रकट केले आहे. वेदान्तानुसार परमात्मप्राप्तीच मनुष्यजीवनाचे अंतिम साध्य आहे. कारण मनुष्यजीवनातच जन्ममृत्यूपासून सुटका करून घेणे शक्य आहे.



सांख्यांच्या मताने या जगात अचेतन प्रकृती आणि अनेक चेतन पुरुष ही दोन मूलतत्त्वे आहेत. पुरुषाच्या संबंधामुळे प्रकृती स्वतः उत्पत्तिक्रमानुसार - म्हणजेच प्रकृतीपासून महत्तत्त्व, महत्तत्त्वापासून अहंकार, अहंकारापासून मन, इंद्रिये आणि पंच तन्मात्रा, पंच तन्मात्रांपासून स्थूल पंचमहाभूते - या क्रमाने प्रकट होते. या अचेतन प्रकृतीपेक्षा चेतन पुरुष भिन्न आहे, हे ज्ञान प्राप्त करून मोक्ष मिळवणे, हे मानवी जीवनाचे लक्ष्य आहे.

पण हे सिद्धांत आसुरी प्रकृतीचे (लोकायत किंवा चार्वाकपंथी) लोक मानत नाहीत. ते सुखोपभोगातच जीवनाची सार्थकता मानतात.

**यावज्जीवेत् सुखं जीवेत्, ऋणं कृत्वा घृतं पिबेत् ।**
**भस्मीभूतस्य देहस्य पुनरागमनं कुतः ।।**

''जिवंत आहे तोपर्यंत सुखाने जगावे. कर्ज काढूनही तूप प्यावे. मेल्यावर तर देहाची राखच होते. पुन्हा थोडेच यायचे आहे!'' अशी त्यांची विचारसरणी असते.

या जगात मनुष्यप्राण्याचे केवळ दोन वर्ग आहेत. ज्ञान, सद्गुण, संयम, औदार्य, निरहंकारिता यांची आराधना करणारी सात्त्विक प्रकृती ज्यांच्यामध्ये प्राधान्याने आहे, अशा माणसांचा एक वर्ग! आणि स्वतःचा मोठेपणा, स्वतःच्या वासनांची तृप्ती, प्रचंड, अनियंत्रित भोगलालसा, अपरिमित स्वार्थी व दंभ अशी राजसिक व तामसिक प्रकृती प्राधान्याने ज्यांच्यामध्ये आहे अशांचा दुसरा वर्ग!! बाकीचे भेदाभेद हे केवळ माणसाने निर्मिलेले. या दोन वर्गातच सारे विश्व सामावले आहे. हे दोन वर्ग म्हणजे दैवी व आसुरी प्रवृत्तींचे प्रतिनिधी होत. हिंदू धर्माच्या सर्व शास्त्र-पुराण-ग्रंथामध्ये प्राचीन काळापासून हा देव-असुर भेद प्रतीकांच्या रूपाने सतत आला आहे. संपूर्ण रामायण व महाभारत यांमध्ये या दोन प्रवृत्तींचा, संस्कृतींचा संघर्ष चित्रित केला आहे. जीवनातील प्रकाशाचे धनी दैवी प्रवृत्तीचा माणूस एका बाजूला आणि जीवनातील अंधकाराचे प्रतीक आसुरी प्रवृत्तीचा माणूस दुसऱ्या बाजूला या दोघांतील संघर्षाचे चित्र म्हणजे पांडव-कौरव व राम-रावण यांच्यातील युद्ध होय! प्रत्येक मनुष्याच्या आंतरिक जीवनात व व्यापारात हाच संघर्ष प्रतिबिंबित झाला आहे. म्हणूनच भगवंतांनी सोळाव्या अध्यायाची योजना आत्मपरीक्षणासाठी करून प्रत्येक मनुष्याला कल्याणाचा मार्ग दाखविला आहे. भौतिक जगात देव व असुर असे दोन 'भूतसर्ग' (प्राण्यांचे प्रकार) आहेत असे जे म्हटले आहे (श्लो. ६) त्याचा अर्थ असा नव्हे की, ईश्वराने जन्मतःच अशा दोन प्रकारचे आत्मे निर्माण केले आहेत. वस्तुस्थिती अशी आहे की, सर्वच आत्मे शुद्ध, बुद्ध, मुक्त व नित्य असे आहेत, मग ते असुर

असोत अथवा देव असोत. फक्त अज्ञान आणि अविद्येमुळे ते बंधनात अडकलेले असतात. पण हे सर्वच आत्मे मुक्ति-मोक्ष मिळवू शकतात. अगदी सर्वाधिक पातकी मानव देखील ईश्वराभिमुख होऊ शकतो. हे भगवंतांनी गीतेत दिलेले आश्वासन आहे. (गीता अ. ९-३०,३१). सर्व मानवांची सर्वसाधारण प्रकृती एकाच प्रकारची आहे. सत्त्व-रज-तम ही त्रिगुणात्मक प्रकृती हे त्याचे स्वरूप आहे. आसुरी प्रकृती म्हणजे राजसिक प्रकृतीचाच कळस! हीच प्रकृती ईश्वरविषयक ज्ञानाच्या, मोक्षाच्या, पूर्णतासंपादनाच्या आड येते. सत्त्वगुणाचा विकास हा, मोक्षाची प्रवृत्ती निर्माण करतो. सर्व मनुष्यांमध्ये सात्त्विक तत्त्व विकसित व बलवान करण्याची पात्रता व सामर्थ्य भगवंतांनी आधीच देऊन ठेवले आहे. नराचा नारायण होण्याचे सामर्थ्य स्वभावतःच प्रत्येक मनुष्यामध्ये आहे. पण आसुरी अवगुण त्याच्या उन्नतीच्या, देवत्वाच्या आड येतात. हे मारक गुण नीटपणे समजावेत म्हणूनच त्याचे विस्तृत वर्णन, या अध्यायात भगवंतांनी केले आहे. भगवान श्रीकृष्ण म्हणतात,

**एतां दृष्टिमवष्टभ्य नष्टात्मानोऽल्पबुद्धयः ।**
**प्रभवन्त्युग्रकर्माणः क्षयाय जगतोऽहिताः ।।९।।**
**काममाश्रित्य दुष्पूरं दम्भमानमदान्विताः ।**
**मोहाद्गृहीत्वासद्ग्राहन्प्रवर्तन्तेऽशुचिव्रताः ।।१०।।**
**चिंतामपरिमेयां च प्रलयान्तामुपाश्रिताः ।**
**कामोपभोगपरमा एतावदिति निश्चिताः ।।११।।**
**आशापाशशतैर्बद्धाः कामक्रोधपरायणाः ।**
**ईहन्ते कामभोगार्थमन्यायेनार्थसंचयान् ।।१२।।**
**इदमद्य मया लब्धमिमं प्राप्स्ये मनोरथम् ।**
**इदमस्तीदमपि मे भविष्यति पुनर्धनम् ।।१३।।**
**असौ मया हतः शत्रुर्हनिष्ये चापरानपि ।**
**ईश्वरोऽहमहं भोगी सिद्धोऽहं बलवान् संखी ।।१४।।**
**आढ्योऽभिजनवानस्मि कोंऽन्योऽस्ति सदृशो मया ।**
**यक्ष्ये दास्यामि मोदिष्य इत्यज्ञानविमोहिताः ।।१५।।**
**अनेकचित्तविभ्रांता मोहजालसमावृताः ।**
**प्रसक्ताः कामभोगेषु पतन्ति नरकेऽशुचौ ।।१६।।**

‘‘अशा प्रकारची दृष्टी स्वीकारून अल्पबुद्धीचे हे नष्टात्मे व दुष्ट लोक क्रूर कर्मे आचरीत (जणू) जगाचा अधःपात करण्यासाठीच उत्पन्न होत असतात.’’ ।।९।।



‘‘ढोंगी, गर्विष्ठ व मदोन्मत्त असे हे लोक कधीही न संपणाऱ्या कामाचा म्हणजे विषयोपभोगेच्छेचा आश्रय करून असतात. ते अविवेकाने वाईट कल्पना मनात धरून (त्या पुऱ्या करण्यासाठी) भ्रष्ट आचरणाने वागतात.’’ ।।१०।।

‘‘मृत्यूपर्यंतच्या अनंत चिंता त्यांना भेडसावत असतात. विषयभोगासाठीच जन्म आहे, असा त्यांच्या मनाचा निश्चय असल्यामुळे विषयभोगालाच ते परमपुरुषार्थ मानतात.’’ ।।११।।

‘‘शेकडो आशांच्या जाळ्यात गुरफटलेले ते (आसुरी लोक) काम आणि क्रोध यांच्या अधीन होतात आणि विषयोपभोगासाठी अन्यायाने द्रव्यादी पदार्थांचा संग्रह करण्याचा खटाटोप करीत असतात.’’ ।।१२।।

‘‘मी आज हे मिळविलेच आहे. उरलेल्या इच्छाही लवकरच पूर्ण करीन. आज मी इतके द्रव्य मिळविले आहेच. पुन्हा आणखीही द्रव्य मला प्राप्त होईल.’’ ।।१३।।

‘‘या शत्रूचा मी वध केला. उरलेल्यांनाही मी लवकरच मारीन. मी ऐश्वर्यसंपन्न ईश्वर आहे, उपभोग घेणारा मीच आहे. मीच सर्व सिद्धींनी युक्त आहे. मीच शक्तिमान आणि सर्वांत सुखी आहे.’’ ।।१४।।

‘‘सर्वांत धनवान मीच. माझा जन्म थोर कुळात झाला आहे. माझ्यासारखा दुसरा कोण आहे? मी यज्ञ करीन, दान देईन, मजेत राहीन’’ असे मनात मांडे रचणारे आसुरी स्वभावाचे लोक अविवेकाने आंधळे झालेले असतात.’’ ।।१५।।

‘‘अनेक प्रकारच्या कल्पनांनी भ्रांत झालेले, मोहाच्या जाळ्यात अडकलेले आणि विषयसुखांच्या भोगांत अत्यंत आसक्त झालेले हे लोक अतिशय घाणेरड्या नरकात पडतात.’’ ।।१६।।

- आसुरी संपत्ती जिथे वास करते तिथे विध्वंस, संहार, नाश, अधःपात अपरिहार्यपणे येतो याचे वर्णन ९व्या श्लोकात केले आहे, जेव्हा सत्कर्मे लोप पावतात तेव्हा सद्भावाचा अभाव निर्माण होतो. सद्भाव नसेल तेथे सद्विचारसुद्धा राहत नाहीत. सद्विचार संपले की आसुरी संपत्ती फोफावलीच म्हणून समजायचे! कर्तव्य-अकर्तव्य, पाप-पुण्य, लोक-परलोक, प्रवृत्ती-निवृत्ती याचा कोणताही विधिनिषेध त्यांना नसल्याने अनीश्वरवादी होऊन हवे ती कर्मे ते करीत असतात. केवळ जडवादी, भोगवादी होऊन विवेकशून्य वर्तनाने ते स्वतःचा व जगाचा नाश करण्यास प्रवृत्त होतात. ह्या लोकांची बुद्धीची गती सत्य, धर्म, सदाचार... अशा प्रांतात चालत नाही. पारमार्थिक विषय त्यांना तुच्छ, त्याज्य वाटतात. पण सांसारिक भोग-विषयांना मात्र ते आनंदाने कवटाळतात. कर्माच्या फळाविषयी पूर्णपणे बेफिकीर असल्यामुळे निषिद्ध

कर्माचे भय अशा राक्षसी वृत्तीच्या लोकांना वाटत नाही. त्यामुळे ही अधम माणसे आपल्या सामर्थ्याचा, ऐश्वर्याचा, सत्तेचा वापर दुसऱ्यांच्या नाशासाठीच करतात, जगाच्या अकल्याणात त्यांना आसुरी समाधान वाटते.

ही माणसे जगात कशी वावरतात त्याचे वर्णन १० व्या श्लोकात केले आहे. ययातीसारखे केवळ कामाचा आश्रय करून वासनांची पूर्ती करण्यातच ते धन्यता मानतात. अपरिमित वासना-भोग कधीही संपत नाहीत व त्यातून तृप्ती कधीही होत नाही. त्यामुळे ढोंग, गर्व व उन्मत्तता यांचा स्वभाव बनून हे लोक केवळ भ्रष्ट आचरण करीत असतात. शास्त्र, वेद, वर्णाश्रम, कुलपरंपरा, साधनशुचिता यांच्या मर्यादा न पाळता तामसी, मूढ बुद्धीने अनिर्बंध, बेताल वागणे हाच त्यांचा स्थायिभाव बनतो.

आसुरी प्रवृत्ती धारण करणाऱ्यांचा भाव, नियम, आचरण कसे असते याचे वर्णन ११व्या व १२व्या श्लोकात भगवंतांनी केले आहे. विषयोपभोग हाच पुरुषार्थ मानून ते जगत असतात. सतत अतृप्ती असल्यामुळे अनंत चिंता त्यांना छळत असतात. मृत्यूपर्यंत केवळ सांसारिक चिंतांनी ते आतून पोखरलेले असतात. सुख ओरबाडणे व त्यासाठी कशाचाही विधिनिषेध न पाळणे हा त्यांचा धर्म बनतो. शारीरिक भोग-लालसा पूर्ण करता करता ते काम-क्रोधाच्या पूर्णपणे अधीन होतात. हे सर्व करण्यासाठी अमाप धनाची लालसा करून वस्तूंचा संग्रह करण्यात ते मग्न झालेले असतात. शेकडो आशा-आकांक्षांनी त्यांना घेरलेले असते. मरेपर्यंत आशा-पाशातून ते मुक्त होत नाहीत. सांसारिक इच्छा, आशा, वासना पूर्ण करण्यासाठी जे धन मिळवायचे तेही अन्याय, फसवणूक, अनीती, भ्रष्टाचार यांचा आधार घेऊन!

काम-क्रोध, दंभ, गर्व, अभिमान, उन्मत्तता या अवगुणांनी भरलेले हे आसुरी प्रवृत्तीचे लोक कशा प्रकारचे मनोरथ करीत असतात, त्याचे वर्णन १३, १४ व १५ या श्लोकांत भगवंतांनी केले आहे. प्रचंड मोह व लोभ असल्याने अविरत मनोरथांचे डोलारे उभे करण्यात यांचा हातखंडा असतो. आज इतके धन मिळविले, जमीन-जुमला, घरे-दारे मिळविली, इतक्या इच्छा पूर्ण झाल्या, अजून इतक्या ध्येयांची पूर्तता व्हायची आहे. याचा हिशोब मनात रेंगाळत असतो व लोभही तेवढाच वाढत असतो. त्यामुळे मनोरथही वाढत असतात. भविष्यकाळात कसे व किती धन मिळवायचे, त्यासाठी कोणत्या क्लृप्त्या योजायच्या याचाही आराखडा तयार असतो. हे सर्वसामान्य माणूसही करतोच पण आसुरी प्रवृत्तींच्या लोकांचे हे करणे विधिनिषेधशून्य व केवळ कामोपभोगासाठीच असते हा त्यातील फरक! क्रोधाधीन झाल्यामुळे शत्रूविषयी सतत वैरभाव ठेवून, त्यांना नामोहरम करण्यासाठी हे लोक



प्रयत्नशील असतात. मार्गात येणारे इतके शत्रू आज मी खलास केले, उद्या इतक्या जणांचा काटा काढेन. आसुरांच्या चरित्राचे सार म्हणजे सत्ता, संपत्ती व आसुरी संस्कृती या तीन वस्तूंत आहे. संपत्तीच्या जोरावर सत्ता व सत्तेच्या जोरावर स्वतःच्या संस्कृतीचा उदोउदो करून ती जगावर लादण्याचा प्रयत्न करायचा, हे यांचे ध्येय! सारी सत्ता स्वतःच्या ठिकाणी केंद्रीभूत करून मार्गात येणाऱ्या विरोधकांना ठेचायचे; सामर्थ्यवान, ऐश्वर्यवान होऊन स्वतःलाच ईश्वर मानायचे; ही या आसुरांची मनीषा! हे सर्व मिळाले की, आपण जगातले सर्वांत सुखी आहोत म्हणून डांगोरा पिटायचा व आपल्यासारखे बलवान, सिद्ध कोणी नाहीत या थाटात वावरायचे हा यांचा खाक्या! अज्ञान व शास्त्रविहीनता याच्या जोडीला अभिमान, गर्व असल्यामुळे कीर्ती प्राप्त करण्यासाठी यज्ञयाग, दान-धर्म याचाही हे लोक आश्रय करायला मागेपुढे पाहत नाहीत. त्यामुळे उद्या आपण ही सत्कार्ये करू व जगात कीर्ती मिळवू याचेही मनोरथ हे आसुर करीत असतात.

निरीश्वरवादी, भोगवादी, जडवादी अशा आसुरी प्रवृत्तींचे लोक अनेक प्रकारच्या कल्पनांनी भ्रांत होऊन संसारात आसक्त झालेले असतात. जिवंतपणी जसे ते द्वेष्टे, अशांत, क्रोधी असतात तशीच मृत्यूनंतर त्यांची अवस्था काय होते याचे वर्णन १६ व्या श्लोकात केले आहे. या आसुरी लोकांना मृत्यूनंतर केवळ नरक प्राप्त होतो, असे भगवंतांनी इथे सांगितले आहे. याचीच पुनरुक्ती भगवंत पुढील श्लोकांतून विस्तृतपणे करीत आहेत.

**आत्मसम्भाविताः स्तब्धा धनमानमदान्विताः ।**
**यजन्ते नामयज्ञैस्ते दम्भेनाविधिपूर्वकम् ।।१७।।**
**अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं च संश्रिताः ।**
**मामात्मपरदेहेषु प्रद्विषन्तोऽभ्यसूयकाः ।।१८।।**
**तानहं द्विषतः क्रूरान्संसारेषु नराधमान् ।**
**क्षिपाम्यजस्रमशुभानासुरीष्वेव योनिषु ।।१९।।**
**आसुरीं योनिमापन्ना मूढा जन्मनि जन्मनि ।**
**मामप्राप्यैव कौन्तेय ततो यान्त्यधमां गतिम् ।।२०।।**
**त्रिविधं नरकस्येदं द्वारं नाशनमात्मनः ।**
**कामःक्रोधस्तथा लोभस्तस्मादेतत्त्रयं त्यजेत् ।।२१।।**
**एतैर्विमुक्तः कौन्तेय तमोद्वारैस्त्रिभिर्नरः ।**
**आचरत्यात्मनः श्रेयस्ततो याति परां गतिम् ।।२२।।**
**यः शास्त्रविधिमुत्सृज्य वर्तते कामकारतः ।**
**न स सिद्धिमवाप्नोति न सुखं न परां गतिम् ।।२३।।**

**तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ ।**
**ज्ञात्वा शास्त्रविधानोक्तं कर्म कर्तुमिहार्हसि ।।२४।।**

‘‘स्वतःच स्वतःला श्रेष्ठ मानणारे, घमेंडखोर, धनाचा व मानसन्मानाचा माज चढलेले ते लोक देखाव्यासाठी नुसते नावाचेच यज्ञ करतात. शास्त्राच्या नियमांना धरून ते मुळीच नसतात.’’ ।।१७।।

‘‘अहंकारी, बळाचा माज चढलेले, घमेंडखोर, विषयसुखात बुडलेले (आणि त्यात कमी पडल्यास) रागाने भडकणारे व इतरांच्या निंदेत रमणारे हे लोक असतात. ते त्यांच्या स्वतःच्या आणि इतरांच्याही देहात असणाऱ्या माझा - अन्तर्यामी परमेश्वराचाच - द्वेष करीत असतात.’’ ।।१८।।

‘‘त्या ईश्वराचा द्वेष करणाऱ्या क्रूर, पापी नराधमांना मी वारंवार संसारात आसुरी योनीतच टाकीत असतो.’’ ।।१९।।

‘‘हे अर्जुना! ते अज्ञानी जन्मोजन्मी आसुरी योनीतच जन्म घेतात. त्यामुळे माझ्यापर्यंत येतच नाहीत. उलट अधिकाधिक अधम गती प्राप्त करतात.’’ ।।२०।।

‘‘आत्म्याचा नाश करणारी अर्थात जीवाला परमात्म्याकडे न नेणारी, नरकात जाण्याची काम, क्रोध, लोभ ही तीन दारे आहेत. म्हणून या तिहींच्या वाऱ्यालाही उभे राहू नये.’’ ।।२१।।

‘‘हे अर्जुना! अंधाराकडे नेणाऱ्या या तीन दारांपासून दूर राहिलेला माणूस स्वतःच्या कल्याणाचे आचरण करतो. त्याने तो श्रेष्ठ गतीला जातो.’’ ।।२२।।

‘‘जो शास्त्राचे नियम सोडून आपल्या मनाप्रमाणे वागतो, त्याला श्रेष्ठ जीवन मिळत नाही, सुख मिळत नाही, आणि मोक्ष तर नाहीच नाही.’’ ।।२३।।

‘‘म्हणून आपल्याला योग्य काय व अयोग्य काय हे ठरविण्यासाठी तुला शास्त्राचाच आधार घेतला पाहिजे. म्हणून तू या जगात शास्त्र समजून घे आणि त्यात सांगितल्याप्रमाणे कर्मे कर.’’ ।।२४।।

- आसुरी-प्रवृत्तीच्या लोकांना आपल्या दुराचारांचे फळ केवळ नरकप्राप्ती आहे हे सांगून दैवी प्रवृत्तींच्या लोकांनाच श्रेष्ठ गतिरूपी खरे सुख प्राप्त होईल असे वर्णन भगवंतांनी वरील श्लोकांत केले आहे. हे आसुरी लोक केवळ प्रदर्शनासाठी व कीर्तीसाठी शास्त्रनियमांना सोडून यज्ञ-याग करतात. विपरीत बुद्धी धारण करून केवळ ऐहिक भोगप्राप्तीसाठी दान वगैरे करतील पण त्यात पारमार्थिक कल्याणाचा अभाव असेल. हे लोक स्वतःच्या व इतर सर्वांच्या अंतःकरणात विराजमान असणाऱ्या भगवंताची अवहेलना व द्वेष करतात. म्हणून अशा नराधमांना मी वारंवार आसुरी योनीत पाठवीत असतो असे भगवंताचे वचन आहे. असे लोक जन्मोजन्मी पापयोनीतच राहतात व



पुढे पुढे तर त्यांच्या नीच कर्मांनुसार त्यांना अधिकाधिक क्षुद्र योनी प्राप्त होतात. २१ व्या सारभूत श्लोकांत याचे अधिक वर्णन भगवंतांनी केले आहे. आत्मनाशास कारणीभूत असणारी काम, क्रोध व लोभ ही तीन नरकाची दारे आहेत. सर्व जगाला नाचविणारे हे माणसाचे खरे शत्रू आहेत. कामातूनच क्रोध व लोभ उत्पन्न होतात. काम ही कधीही तृप्त व पूर्ण न होणारी गोष्ट आहे. कामाला अनुकूल परिस्थिती प्राप्त झाली म्हणजे लोभ उत्पन्न होतो व प्रतिकूल परिस्थिती निर्माण झाली म्हणजे क्रोध उत्पन्न होतो. संपूर्ण गीतेत भगवंतांनी वारंवार या तीन शत्रूपासून सावध राहण्याचा उपदेश केला आहे. गीतेत यासाठी संयमाचा मार्ग दाखविला आहे. श्रेष्ठ गती प्राप्त होण्यासाठी या तीन दारांपासून दूर राहण्याचा मंत्र इथे सांगितला आहे. या काम-क्रोध-लोभापासून बचाव करण्यासाठी व आत्मकल्याण साधण्यासाठी शास्त्रीय संयमाची कास धरली पाहिजे, हा गीतेचा आग्रह आहे. शास्त्रविधीला सोडून जो अनिर्बंध आचरण करतो त्याला सुख, मोक्ष व कोणतेच श्रेष्ठ जीवन प्राप्त होत नाही. पण शास्त्राचाच आधार घेऊन जो संयमित जीवन जगतो, तोच उन्नत जीवन जगतो. प्रवृत्ती व निवृत्ती, योग्य-अयोग्य, पाप-पुण्य, कर्तव्य-अकर्तव्य, विहित-अविहित, बन्ध-मोक्ष या सर्वांचे ज्ञान त्याला शास्त्रवचनांनी घडते. म्हणून भगवंत अर्जुनाला शेवटी उपदेश करतात की, ‘‘तू हे शास्त्र जाणून घे व त्याप्रमाणे कर्मे कर.’’

भगवंतांनी आसुरी संपत्ती दूर करून दैवी संपत्तीची कास धरावी असा उपदेश या अध्यायात पुनःपुन्हा केला आहे. सोळाव्या अध्यायाचे हेच सार आहे.

**।। श्रीकृष्णार्पणमस्तु ।।**

# अध्याय सतरावा
## श्रद्धात्रयविभागयोग

सतरावा अध्याय मनुष्याच्या अत्यंत जिव्हाळ्याच्या, मूलभूत अशा स्वभाववैशिष्ट्यांचे दर्शन घडविणारा अध्याय आहे.

श्रद्धा हा संपूर्ण जीवन व्यापून टाकणारा विषय आहे. श्रद्धावान मनुष्याचे जीवन भावमय, रसमय असते. सश्रद्ध अंतःकरण समृद्ध असते. श्रद्धा जगण्याचे बळ देते. श्रद्धावान मनुष्यालाच ज्ञान प्राप्त होते हे भगवंतांनी आधीच सांगितले आहे. अज्ञ, अश्रद्ध असा संशयात्मा नाश पावतो. मनुष्याच्या जीवनात तीन-चतुर्थांश भाग हा भावाचा आहे. भाव संपन्न होण्यासाठी श्रद्धेची जीवनात आवश्यकता आहे. जीवनातल्या अनेक नात्यागोत्यांचे संबंध हे श्रद्धेवरच समजायचे असतात. त्या नात्यांना साक्षी-पुराव्यांची गरज नसते. अशा श्रद्धेचे स्वरूप समजणे, हे जीवन यशस्वी करण्यासाठी गरजेचे आहे.

श्री शंकराचार्यांच्या मते श्रद्धा म्हणजे शास्त्रवचन आणि गुरुवचन यावरील अविचल निष्ठा! ह्या श्रद्धेमुळेच अंतिम सत्याचा साक्षात्कार होतो. एखादा संप्रदाय किंवा विशिष्ट मतप्रणालीवरचा विश्वास असा याचा मर्यादित अर्थ नाही. श्रद्धा म्हणजे स्वतःवरचा विश्वास, प्रत्येक आत्म्याच्या ठिकाणी वसत असलेल्या अनंत शक्तींवरचा विश्वास! शंकराचार्यांनी ज्याचे वर्णन आस्तिक्य बुद्धी असे केले आहे अशी सकारात्मक वृत्ती म्हणजे श्रद्धा. चारित्र्य संवर्धनासाठी माणसाने केलेले प्रयत्न, त्याचे सद्गुण, समाजजीवनातील त्याचा व्यवहार, विज्ञान व धर्म ह्या क्षेत्रामध्ये सत्याचा शोध घेण्यासाठी त्याने केलेली धडपड ह्या सगळयामागची श्रद्धा हीच प्रेरक शक्ती आहे. श्री योगी अरविंद आपल्या गीतेवरील भाष्यात म्हणतात, ''धर्म, तत्त्वज्ञान, नीती, सामाजिक विचार, सांस्कृतिक कल्पना यापैकी ज्याच्यावर माझी श्रद्धा आहे, तोच माझ्या जीवनाचा आदर्श बनतो. त्या विचारांशी मी किती प्रामाणिक आहे, त्या तत्त्वावर माझा किती विश्वास आहे आणि त्यानुसार आचरण करावे असे मला किती उत्कटतेने वाटते त्या प्रमाणात मी त्या आदर्शाजवळ पोहोचू शकतो. त्या आदर्शाचे मूर्तिमंत प्रतीक बनून जाणेही माझ्याच हातात आहे.''



एखादा मनुष्य महान बनतो आणि दुसरा कोणी सामान्य, दुबळा राहतो याचे कारण श्रद्धाच आहे. आपल्या आत्मबलावर जेवढा विश्वास तेवढी आपली प्रगती होते. मनुष्यात प्रचंड ऊर्जा आहे. आत्म्यातच सर्व शक्तींचा वास आहे. पण ती प्रकट झाली पाहिजे. त्यासाठी दुर्दम्य आत्मविश्वास आणि ध्येयसिद्धीसाठी अपार कष्ट करण्याचा दृढ निश्चय पाहिजे. अशा वृत्ती म्हणजेच श्रद्धा. ज्यांच्याजवळ अशी अविचल श्रद्धा होती त्यांनीच इतिहासात प्रचंड कार्य करून दाखविले आहे. श्रद्धाच माणसाला घडविते. ज्याची जशी श्रद्धा असेल तसा तो घडतो हे गीतेचे सांगणे आहे. आपले एकूण कर्म, साधना, दानधर्म यामध्ये जर शुद्ध श्रद्धाभाव नसेल तर ती सगळी खटपट निष्फळ ठरते. उपनिषदांमध्येही जीवनातील श्रद्धेचे महत्त्व प्रेरणादायी शब्दात वर्णिले आहे. गुरुकुलामध्ये शिक्षण पूर्ण करून गृहस्थाश्रमात प्रवेश करणाऱ्या शिष्याला तैत्तिरीय उपनिषदात दानाचे महत्त्व सांगितले आहे. हे दान श्रद्धापूर्वक दिले पाहिजे आणि श्रद्धेशिवाय काहीही देऊ नये असा इशाराही दिला आहे.

माणसाची प्रत्येक कृती हा त्याच्या श्रद्धेचाच परिणाम असतो. त्याच्या प्रत्येक कृतीत त्याचा श्रद्धाभावच प्रतिबिंबित होत असतो. श्रद्धापूर्वक केलेले प्रत्येक काम निर्दोष व परिपूर्ण असते. कारण काम हे काम न राहता त्याला पूजेचे स्वरूप प्राप्त होते. त्यामुळेच स्वामी विवेकानंद म्हणतात की, माझे काम हीच माझी देवपूजा आहे.

जगात विविध लोक विविध प्रकारे आचरण करतात. भगवंतालाही लोक नानाविध रूपांतून आळवितात. अनेकविध मतमतांतरामुळे नानाप्रकारचे पंथ, संप्रदाय निर्माण झाले आहेत. जो शास्त्रोक्त विधी सोडून म्हणजे कर्तव्य कोणते व अकर्तव्य कोणते याचा निर्णय करण्यात शास्त्र प्रमाण न मानता, मनाला वाटेल त्याप्रमाणे आचरण करतो, त्याला सिद्धी, सुख व परमगती प्राप्त होत नाही, हे भगवंतांनी सोळाव्या अध्यायातील २३ व्या श्लोकात पूर्वीच सांगितले. हे ऐकून अर्जुनाच्या मनात असा विचार आला की, हे शास्त्र बुद्धिपूर्वक जाणून त्याचे यथाविधी आचरण किंवा भक्ती करणारे किती जण आहेत? बहुतेक जण कुल-परंपरा, वर्ण, आश्रम, संस्कार, अनुकरण यांनुसार जशी जमेल, जेवढी जमेल, तेवढी निरनिराळ्या देव-देवतांची भक्ती करतात. यामध्ये केवळ श्रद्धा बलवान असते. अर्जुनाचा प्रश्न हा सर्वांचा प्रातिनिधिक प्रश्न आहे. म्हणून भगवंतांनी दिलेले उत्तर आजसुद्धा मननीय, चिंतनीय व अनुकरणीय असे आहे. आज भक्ती ओसंडून वाहते आहे. जिथे-तिथे भक्तीचा मळा फुललेला आहे. मंदिरे भक्तांच्या मांदियाळींनी

फुललेली-सजलेली आहेत, उत्सव, महाप्रसाद, पारायणे, दान-धर्म, यज्ञ-त्याग, अनुष्ठाने इ.नी भक्तिमय वातावरण निर्माण झाले आहे. या सर्व गोष्टी शास्त्रविधीनुसार घडतात का? यांत केवळ श्रद्धा, निष्ठाच असेल तर अशा भक्तीने भगवंत प्रसन्न होतो का? भक्तीची गोमटी फळे प्राप्त होतात का? म्हणून अर्जुनाने या अध्यायाच्या सुरुवातीला हा प्रश्न विचारून अशा भक्तांची नेमकी अवस्था काय होते, याचे विवरण करण्यास भगवंताला विनविले आहे.

अर्जुन विचारतो,

**ये शास्त्रविधिमुत्सृज्य यजन्ते श्रद्धयान्विताः ।**
**तेषां निष्ठा तु का कृष्ण सत्त्वमाहो रजस्तमः ।।१।।**

‘‘हे श्रीकृष्णा! जे लोक शास्त्राचे नियम (माहीत नसल्यामुळे ते) सोडून श्रद्धापूर्वक देव-देवतांची पूजा करतात, त्यांची निष्ठा म्हणजे मनाची स्थिती कोणती असते? सात्त्विक, राजस की तामस?’’

शास्त्राविषयीचे अज्ञान असल्यामुळे आपल्या स्वभावानुसार व निष्ठेनुसार जे भक्ती करतात, त्यांना कोणती गती प्राप्त होते हे अर्जुनाला जाणावयाचे होते. प्रत्येकाची एक विशिष्ट श्रद्धा असते. तीच त्याच्या अंतःकरणातील ऊर्जा बनते. हीच ऊर्जा त्याला संसारातील सर्व कर्मांना पार करण्यास कारण बनते. कोणाला ज्ञानी होण्यासाठी अखंड साधना करण्यास प्रवृत्त करते तर एखाद्या कर्ममार्गी योग्यास भव्य, दिव्य कर्तृत्व करण्याची प्रेरणा देते. भक्तीलाही पोषक हीच ऊर्जा ठरते. श्रद्धा म्हणजे दृढ विश्वास, उत्कट इच्छा, आदर व आत्मीयतेची प्रखर भावना, मनाची स्वाभाविक प्रवृत्ती! ह्या सर्वांचे जे रसायन होते ती श्रद्धा... तीच निष्ठा... प्रत्येक मनुष्याचे व्यक्तिमत्त्व या श्रद्धेनुसार घडते. जशी श्रद्धा तसे व्यक्तित्व... तसेच चारित्र्य... तशीच गुणसंपदा. या श्रद्धेचे स्वरूप खूप विस्तृत आहे. आपली जिथे श्रद्धा असते, त्यानुसारच आपले वर्तन घडते. ज्या व्यक्तीवर आपली श्रद्धा असते त्यांचेच सदैव चिंतन होते. नुसते चिंतनच नव्हे तर त्या व्यक्तीच्या गुणांचे व कृतीचे अनुकरणही सहज घडत असते. ज्यांच्यावर आपली श्रद्धा असते त्यांचा प्रत्येक शब्द आपण शिरोधार्य मानतो. तो शब्द आपला मंत्र ठरतो. व्यवहारातल्या प्रत्येक क्षेत्रात याचा आपणास अनुभव येतो. शिक्षकाचे विचार, आचार याचे अनुकरण तो विद्यार्थी नकळत करत असतो. गुरू-शिष्याचे नातेही असेच असते. मग ते अध्यात्मातील असू दे किंवा संगीतशास्त्रातील! श्रद्धा नसेल तर प्रत्यक्ष भगवंत समोर येऊनसुद्धा अश्रद्धावर काही परिणाम होणार नाही. प्रत्यक्ष राम समोर असताना रावणाच्या स्वभावात काही



फरक पडला नाही. पण शबरी श्रद्धापूर्वक रामाची प्रतीक्षा करीत होती व एक दिवस शबरीला तिच्या उत्कट श्रद्धेचे फळ मिळाले व जीवन धन्य झाले. तिची उष्टावलेली फळेसुद्धा रामाने आनंदाने खाल्ली. ‘‘श्रद्धावान् लभते ज्ञानं’’... श्रद्धावानालाच ध्येयप्राप्ती होते. श्रद्धा कोणत्याही वस्तू, पदार्थ, व्यक्ती, व्यक्तित्व, आदर्श, कर्तव्य यावर असो, पण मनुष्याला ती आपल्या ध्येयाप्रत नेते. या श्रद्धेवर संपूर्ण जीवन उभारते. चुकीच्या ठिकाणी असेल तर सर्वनाशसुद्धा हीच श्रद्धा घडविते.

म्हणून शास्त्र जरी माहीत नसले तरी या श्रद्धेनुसार मनुष्य भक्ती करत असतो. म्हणून त्याचे स्वरूप, भेद याचे वर्णन भगवंत पुढील श्लोकांतून करीत आहेत.

श्री भगवान म्हणाले,

**त्रिविधा भवति श्रद्धा देहिनां सा स्वभावजा ।**
**सात्त्विकी राजसी चैव तामसी चेति तां शृणु ।।२।।**
**सत्त्वानुरूपा सर्वस्य श्रद्धा भवति भारत ।**
**श्रद्धामयोऽयं पुरुषो यो यच्छ्रद्धः स एव सः ।।३।।**
**यजन्ते सात्त्विका देवान्यक्षरक्षांसि राजसाः ।**
**प्रेतान्भूतगणांश्चान्ये यजन्ते तामसा जनाः ।।४।।**
**अशास्त्रविहितं घोरं तप्यन्ते ये तपो जनाः ।**
**दंभाहंकारसंयुक्ताः कामरागबलान्विताः ।।५।।**
**कर्शयन्तः शरीरस्थं भूतग्राममचेतसः ।**
**मां चैवान्तःशरीरस्थं तान्विद्ध्यासुरनिश्चयान् ।।६।।**

‘‘मनुष्याची स्वभावतःच उत्पन्न झालेली श्रद्धा तीन प्रकारची असते-सात्त्विक, राजस आणि तामस. कशी ती ऐक.’’ ।।२।।

‘‘हे भारता! प्रत्येकाची श्रद्धा त्याच्या त्याच्या सत्त्वाप्रमाणे म्हणजे प्रकृतिस्वभावाप्रमाणे होत असते. मनुष्य हा श्रद्धामय आहे. ज्याची जशी श्रद्धा असते, तसाच तो असतो.’’ ।।३।।

‘‘सात्त्विक लोक देवांचे पूजन करतात तसेच राजस लोक यक्ष आणि राक्षस यांचे पूजन करतात. इतर तामसी लोक प्रेते व भूतगण यांची पूजा करतात.’’ ।।४।।

‘‘जे लोक दंभ आणि अहंकार यांनी युक्त होऊन काम, आणि आसक्तीच्या जोरावर शास्त्राविरुद्ध अघोरी तप करतात, ते अविवेकी लोक शरीरातील पंचमहाभूतांनाच नव्हे, तर शरीरात राहणाऱ्या (जीवात्मस्वरूप) मलाही कष्ट देतात. ते आसुरी बुद्धीचे समजावे.’’ ।।५-६।।

सात्त्विक, राजसिक व तामसिक अशा तीन प्रकारच्या श्रद्धा मनुष्याच्या ठायी असतात. सात्त्विक श्रद्धा ज्ञान, भक्ती तसेच कर्तव्य ह्यांना प्रोत्साहित करणारी आहे. राजसिक श्रद्धा असणारे कर्मकांडावर निष्ठा ठेवून सतत कार्यरत राहणारे असतात. सात्त्विक लोक अंतर्निष्ठ असतात तर राजसी लोक बहिर्निष्ठ होऊन मोठमोठे यज्ञदान करून फळाची अपेक्षा करणारे असतात. सात्त्विकांच्या ठायी दैवी गुणांचा वास असल्यामुळे ते नम्र, दयाळू, भूतमात्रांवर आत्मौपम्यतेने प्रेम करणारे सहृदयी असतात. संत एकनाथ कावड घेऊन रामेश्वरी जात असताना त्यांनी वाटेत तहानेने तडफडणारे गाढव पाहिले. तत्क्षणी एकनाथांनी त्याला कावडीतील शंकराला वाहायचे पाणी पाजले. ईश्वराचे सर्वत्र दर्शन घेणाऱ्या एकनाथांनी गाढवात देखील भगवंताचे दर्शन अनुभविले. ''जो जशी व जेवढी भक्ती करतो. त्याला मी त्याच्या भक्तीप्रमाणे तेवढेच व तसेच फळ देतो,'' हे भगवंताचे वचन चौथ्या अध्यायाच्या ११ व्या श्लोकात आले आहे. सात्त्विकांना ऊर्ध्वगती, राजसिकांना मध्यमगती व तामसिकांना अधोगती प्राप्त होते. राजस मनुष्य सकाम भावनेने सत्कर्मे करून स्वर्गप्राप्तीसुद्धा करून घेतो, पण पुण्य संपल्यानंतर पुन्हा जन्ममृत्यूच्या रहाटगाडग्यात अडकतो व आपल्या कर्मानुसार जन्म घेतो. तामस मनुष्य कामना, वासना व मूढता यांमुळे अधमगतीला जातो.

प्रत्येक मनुष्याचे व्यक्तित्व व चारित्र्य त्याच्या त्याच्या आंतरिक स्वभावानुसार घडत असते. जशी श्रद्धा तसेच त्याचे विचार आणि जसे विचार तशी कृती. तिसऱ्या श्लोकात 'सत्त्वं' हा शब्द अंतःकरणासाठी योजला आहे. आधीच्या श्लोकात 'स्वभाव' या शब्दाची योजना केली. दोन्हीही शब्द समानार्थी आहेत. ज्याच्या अंतःकरणातील श्रद्धेचे जसे स्वरूप असते तसेच त्याचे वर्तन घडत असते. दुर्योधनाची श्रद्धा भगवंत म्हणून श्रीकृष्णावर नव्हती म्हणून युद्धाच्या आधी त्याची कामना सैन्याची होती, पण अर्जुनाची अनन्यशरण श्रद्धा भगवंतावर होती म्हणून रथाचा सारथी म्हणून केवळ भगवंताची मागणी केली. युद्धामध्ये कौरव-पांडवांना त्यांच्या त्यांच्या श्रद्धेनुसार ते ते फळ प्राप्त झाले. सत्त्व व तामस यांच्यातील हे धर्मयुद्ध होते. दैवी संपत्ती व आसुरी संपत्ती यांच्यातील हा संघर्ष होता. हे तीन गुण जोपर्यंत आहेत तोपर्यंत हा संघर्ष सतत राहणार आहे. प्रत्येक मनुष्यात हे तिन्ही गुण आहेत. राम व रावण दोन्हीही अंतःकरणात आहेत. रावणाचा पराभव म्हणजे राजस व तामस यांचा पराभव करून सत्त्वगुणाने सतत वर यायचे असते. जेवढा सत्त्वगुण प्रभावी होईल, तेवढे राजस व तामस हे निष्प्रभ होतील. कुरुक्षेत्र व धर्मक्षेत्र दोन्हीही आपल्या देहातच



आहेत. कुरुक्षेत्राचे धर्मक्षेत्र होणे म्हणजे मनुष्यत्वाकडून देवत्वाकडे जाणे. भगवंतांनी हा श्रेयाचा मार्ग केवळ मनुष्यप्राण्यांना दिला आहे.

चौथ्या श्लोकात, ह्या तीन प्रकारच्या लोकांच्या वेगवेगळ्या यजन-पूजनाच्या प्रकारावरून त्यांच्या श्रद्धा-निष्ठा कशा जाणता येतात याचे वर्णन आहे. सात्त्विक म्हणजे दैवी संपत्तीवाले मनुष्य देवांची पूजा करतात. राजस लोक यक्ष व राक्षस यांची पूजा करतात. तसेच इतर तामसी लोक भूत-प्रेत वगैरेंना पूजतात. जितके ज्ञान दैवी, जितके सत्त्व प्रभावी, तितकी श्रद्धा प्रभावी. श्रद्धेच्या पाठीशी असलेले सत्त्व सुंदर व भव्य असेल तर जीवनसुद्धा तसेच संपन्न होईल व ते जर निःसत्त्व असेल तर जीवनही तसेच निःसत्त्व होईल. जितकी सात्त्विकता अधिक तितकी ईशविषयक व आत्मविषयक श्रद्धा भव्य होते व कर्मानुरूप त्याचा स्वभाव बनतो. हा स्वभाव म्हणजेच त्याची श्रद्धा होय. जन्म-जन्मांतरापासून त्याने जे काही चिंतन केलेले आहे व जी काही कर्मे केलेली आहेत, त्या सर्वांचा परिणाम त्याच्या चित्तावर व देहावर होतो. शरीर नष्ट जरी झाले तरी चित्तावरील वासना-विचारांचा परिणाम नष्ट होत नाही. शरीर नष्ट होते पण मनावरील हे परिणाम घेऊनच पुढील जन्माचा प्रवास सुरू होतो. चित्तावरील या परिणामाला शास्त्रकार 'स्वभाव' म्हणतात. यानुसार त्या त्या मनुष्याकडून यजन-पूजन, दान-यज्ञ हे सर्व प्रकार घडत असतात. सत्संग, साधना, संस्कार, ज्ञान ह्यांनी त्यातील दुष्ट-तामस वृत्ती क्षीण करायच्या व सत्त्वज्ञान वाढवायचे.

सात्त्विक लोक देवांची पूजा करतात म्हणजे विष्णू, शंकर, गणेश, शक्ती, सूर्य अशा ईश्वरी कोटीतल्या देव-देवतांना भजतात. देव शब्द ईश्वर याचा वाचक आहे यामध्येसुद्धा भेदाभेद होतात. कोण शिवाची तर कोण विष्णूची, कोणाला शक्तिरूप तर कोणाला गणेश अशी प्रत्येकाची आराधना-दैवते वेगवेगळी होतात. ईश्वराच्या ज्या रूपात ज्याची आंतरिक, स्वाभाविक श्रद्धा असते ते रूप त्याला अधिक भावते. राजस मनुष्य यक्ष व राक्षसांचे पूजन करतात. यक्ष-पूजनात धनाच्या संग्रहाची इच्छा अभिप्रेत असते. राक्षस म्हणजे दुसऱ्याचा नाश करून स्वतःच्या कामना पूर्ण करण्याची प्रवृत्ती! तर तामस मनुष्य प्रेत व भूतांची पूजा करतात. जे मृत झालेत ते प्रेत व मृत्यूनंतर जे भूतयोनीत गेलेत त्यांना भूत म्हटले आहे. ज्या देव-देवतांची आपण आराधना करतो, त्यांचे गुण आपल्यात येणे हीच खरी पूजा असते. भगवान श्रीकृष्णाचे पूजन म्हणजे त्यांच्या १६ कलांचे पूजन. जसा पौर्णिमेचा चंद्र १६ कला पूर्ण झाल्यावर पूर्ण होतो, तसे हे गुण मनुष्याने प्राप्त केल्यानंतरच तो देवत्वापर्यंत पोचतो. म्हणून ''शिवो भूत्वा शिवं यजेत्'', ''कृष्णो भूत्वा

कृष्णं यजेत्" असे म्हटले आहे. देव होऊन देवाची पूजा करण्यासाठी एक एक दैवी गुण अंगी आला पाहिजे. हीच खरी सात्त्विक पूजा. जो प्रापंचिक कामनांच्या पूर्तीसाठी पूजा करतो ती राजसिक पूजा. तामसिक पूजा करणारे लोक, भूत-प्रेत यांची पूजा करून अनेक बऱ्या-वाईट सिद्धी प्राप्त करण्यासाठी स्मशानघाटाचा आश्रय करतात. दुसऱ्यांचा नाश करून स्वतःचे कल्याण करण्यासाठी कशाचाही विधिनिषेध ते बाळगीत नाहीत. ही भक्ती नसून केवळ तामसिक कर्म आहे.

पाचव्या व सहाव्या श्लोकात, विरोधपूर्वक, शास्त्रविधीचा त्याग करून, श्रद्धाविहीनतेने कार्यरत असणाऱ्यांचे वर्णन आहे. तामसी बुद्धीमुळे शास्त्रसंमत काही करण्याकडे त्यांचा कल नसतो. अहंकारामुळे ते इतरांना दांभिक समजून, स्वतःच्या फाजील विश्वासामुळे ते जे करतात त्याला ते इष्ट समजतात. संसारातल्या यच्चयावत भोगवस्तूंची प्राप्ती करून, आसक्त होऊन त्याचा भोग घेण्यासाठी कठोर तप करतात. शरीरात असणाऱ्या पंचमहाभूतांना कष्ट देऊन, घोर तप करून त्यांना कृश करण्यात ते धन्य समजतात. भगवंत म्हणतात की, असे लोक प्रत्येकाच्या अंतःकरणात अंशरूपाने असणाऱ्या मला दुःख देतात. ते माझ्या आज्ञेने, विचाराने न जाता अहंकाराने व दांभिकतेने स्वतःच्या मताप्रमाणे वागतात. असे लोक हे निश्चितपणे आसुरी-संपत्तीवाले आहेत.

शरीराला अतोनात कष्ट देणे म्हणजे तप असे ते समजतात. अशा शास्त्रनिषिद्ध गोष्टी करून ते विपरीत कर्मे करतात. सोळाव्या अध्यायातील २३ व्या श्लोकावरून या सतराव्या अध्यायाची मांडणी झाली आहे. शास्त्रविहित मार्ग सोडून आपल्या मनाला वाटेल त्याचप्रमाणे कर्मे करणाऱ्यांना सिद्धी, सुख व परमगती प्राप्त होत नाही, असे तेथे भगवंत सांगतात. पण हे आसुरी लोक शास्त्राला विरोध करून मन मानेल तशी निषिद्ध कृत्ये करतात, म्हणून त्यांना सिद्धी, सुख, परमगती तर मिळतच नाही. पण असे लोक नीच योनीत जातात.

जितकी श्रद्धा बलवान, तितके त्याचे यश, सफलता महान! सिद्धी, सुख, परमगती प्राप्त होण्यासाठी शास्त्रानुसार श्रद्धा अधिकाधिक दृढ केली पाहिजे. ''यादृशी भावना यस्य सिद्धिर्भवति तादृशी" जशी मनुष्याची भावना तशी त्याची सफलता. श्रद्धा असेल तरच मनात भाव निर्माण होतो. ज्ञान, कर्म, भक्ती... कोणत्याही मार्गाने जी काही आंतरिक साधना करायची ती ही श्रद्धा वाढविण्यासाठीच. पवित्र, शुद्ध विचार व दृढ श्रद्धा यांमुळे मनाची स्थिती बदलते. मन बदलले की सारेच बदलते. कारण



**मन करा रे प्रसन्न । सर्व सिद्धीचे कारण**
**मोक्ष अथवा बंधन । सुख, समाधान इच्छा ते ।।**

(संत तुकाराम)

अशा मनाची अवस्था ही श्रद्धेवर अवलंबून असते. जीवनाच्या सर्व व्यवहारात श्रद्धेचे मूल्य खूप आहे. आज समाजात शेकडो मंदिरांतून शेकडो प्रवचने, कीर्तने, पारायणे होतात. वर्षानुवर्ष तेच प्रवचनकार, कीर्तनकार आणि श्रोतेही तेच असतात. रामायण, महाभारत, भागवत, ज्ञानेश्वरी... अशा उदात्त, उत्तुंग, पवित्र विचारांनी भरलेल्या ग्रंथांचे निरूपण होत असते. पण हे होत असताना अपेक्षित बदल, परिवर्तन होत नाही. दोघेही आहेत तिथेच असतात. कारण, केवळ वाचन, श्रवण यांनी हा बदल होत नाही. विचार हा आचरणात, वृत्तीत, स्वभावात यावा लागतो, तेव्हाच हे परिवर्तन घडून येते. उत्तुंग, पवित्र विचार ऐकताना तेवढ्या वेळेपुरते मन प्रसन्न होते, मनाची पातळी उंचावते; पण नंतर प्रपंचाच्या रहाटगाडग्यात ते अनुसंधान राहत नाही व तेच मन पुन्हा विकार, मोह, लोभ, क्रोध यांच्या अधीन होते. विचार हे प्रत्यक्ष आपल्या जगण्यात प्रतिबिंबित झाले पाहिजेत व ते होण्यासाठी मन-बुद्धीची स्थिरता व समत्व साधता आले पाहिजेत. ही आंतरिक शुद्धता प्राप्त होण्यासाठी आपली शास्त्रविचारावर दृढ श्रद्धा असली पाहिजे. श्रद्धाविहीन अवस्थेत केलेले कर्मकांड, दिलेले दान, केलेले तप, भक्ती, ज्ञान हे सारेच व्यर्थ असते. केवळ भीती, परंपरा, अज्ञान यांचा पगडा मनावर असल्यामुळे होणारी ती एक निरर्थक, शुष्क कृती ठरते.

श्रद्धेचे हे महत्त्व जाणून भगवंतांनी या अध्यायाची मांडणी केली आहे. अर्जुन हा निमित्तमात्र आहे. प्रत्येक मनुष्याचे व्यक्तित्व, चारित्र्य, स्वभाव हे त्यांच्या आंतरिक श्रद्धेनुसार घडत असतात. म्हणून भगवंतांनी पहिल्या सहा श्लोकांत या श्रद्धेचे स्वरूप विशद केले. श्रद्धा ही मनुष्याच्या प्रकृतिस्वभावाप्रमाणे होत असते, हे सांगून सात्त्विक, राजस आणि तामस हे श्रद्धेचे तीन प्रकार कथन केले.

आता सातव्या श्लोकापासून भगवंत आहार, यज्ञ, तप व दान यांचे भेद वर्णन करीत आहेत -

**आहारस्त्वपि सर्वस्य त्रिविधो भवति प्रियः ।**
**यज्ञस्तपस्तथा दानं तेषां भेदमिमं शृणु ।।७।।**
**आयुः सत्त्वबलारोग्यसुखप्रीतिविवर्धनाः**
**रस्याः स्निग्धाः स्थिरा हृद्या आहाराः सात्त्विकप्रियाः ।।८।।**

कट्वम्ललवणात्युष्णतीक्ष्णरूक्षविदाहिनः ।
आहारा राजसस्येष्टा दुःखशोकामयप्रदाः ।।९।।
यातयामं गतरसं पूति पर्युषितं च यत् ।
उच्छिष्टमपि चामेध्यं भोजनं तामसप्रियम् ।।१०।।
अफलाकांक्षिभिर्यज्ञो विधिदृष्टो य इज्यते ।
यष्टव्यमेवेति मनः समाधाय स सात्त्विकः ।।११।।
अभिसंधाय तु फलं दम्भार्थमपि चैव यत् ।
इज्यते भरतश्रेष्ठ तं यज्ञं विद्धि राजसम् ।।१२।।
विधिहीनमसृष्टान्नं मंत्रहीनमदक्षिणम् ।
श्रद्धाविरहितं यज्ञं तामसं परिचक्षते ।।१३।।

''प्रत्येकाला आवडणाऱ्या आहाराचेही तीन प्रकार होतात. आणि तोच प्रकार यज्ञ, तप व दान यांचाही आहे. त्याचे निरनिराळे भेद ऐक.'' ।।७।।

''सात्त्विक मनुष्यास आवडणारे आहार, आयुष्य, सात्त्विक वृत्ती, बल, आरोग्य, सुख आणि प्रीती वाढविणारे, रसयुक्त, स्निग्ध, शरीरात मुरून चिरकाल राहणारे आणि मनाला आनंद देणारे असतात.'' ।।८।।

''रजोगुणी माणसांना तिखट, आंबट, खारट, अतिशय गरम, झणझणीत, कोरडे, जळजळ उत्पन्न करणारे पदार्थ आवडतात, ते दुःख, शोक व रोग उत्पन्न करणारे असतात.'' ।।९।।

''तामस पुरुषास आवडणारे अन्न वेळ होऊन गेलेले, नीरस, दुर्गंध येणारे, शिळे, उष्टे व अपवित्र असते.'' ।।१०।।

''फलाशेची आकांक्षा न ठेवता यज्ञ करणे हे आपले कर्तव्य समजून शास्त्रविधीप्रमाणे शांत चित्ताने यज्ञ करतात तो यज्ञ सात्त्विक होय.'' ।।११।।

''पण फलाची इच्छा ठेवून किंवा दंभार्थ म्हणजे ऐश्वर्यप्रदर्शनार्थ जो यज्ञ करतात, तो यज्ञ हे भरतश्रेष्ठ! राजस असे समज.'' ।।१२।।

''शास्त्रविधी सोडून अन्न-संतर्पणाशिवाय, मंत्रावाचून, दक्षिणा न देता आणि श्रद्धा नसता (केलेला) जो यज्ञ त्याला तामस म्हणतात.'' ।।१३।।

भगवान श्रीकृष्ण अर्जुनाला आहार, यज्ञ, तप व दान यांचे तीन-तीन भेद सविस्तर विशद करून सांगत आहेत.

त्रिगुणमयी मायेने हे जग व्यापले आहे. केवळ मनुष्यच नव्हे तर संपूर्ण भूतमात्र या तीन गुणांनी नटले आहे. सत्त्व, रज, तम या तीन गुणांनुसार माणसाचे भावनाविश्व बनते. हे तिन्ही गुण प्रत्येक मनुष्यात कमी-अधिक प्रमाणात जरी असले तरी, रज व तम यांना निष्प्रभ करून सत्त्वगुणाने वर वर यायचे... हे उन्नत माणसाचे लक्षण आहे. जितकी सात्त्विकता वाढेल



तेवढी चित्तशुद्धी होईल. चित्तशुद्धिपूर्वक समर्पित भावनेने केलेले कर्म भगवंताला आवडते. असे कर्म घडण्यासाठी आंतरिक शुद्धीबरोबर बाह्य-कर्माचीसुद्धा शुचिता महत्त्वाची आहे. बाहेरून यज्ञ-दान-तप घडत असताना आतून देखील आध्यात्मिक साधना घडत असते. बाहेरून कर्म घडत असता अंतःकरणात मनाचा मेळ नसेल तर ती क्रिया विधिवत होणार नाही. म्हणून जे जे कर्म हातून घडते, त्यात मनाचा मेळ साधला पाहिजे व हे सर्व श्रद्धापूर्वक घडले पाहिजे.

'आहार'सुद्धा असाच यज्ञ आहे. बाहेरून घ्यायचा हा भोग, हेही एक यज्ञाचेच अंग आहे. प्रत्यक्ष आहार जरी स्वतः यज्ञरूप नसला तरी यज्ञ सिद्ध होण्याचे ते अंग आहे. म्हणून भोजन हे ''उदरभरण नोहे जाणिजे यज्ञकर्म'' असे म्हटले आहे. मनुष्याच्या व्यक्तित्वाची जडण-घडण होण्यात आहाराचे महत्त्व सर्वाधिक आहे. जसा आहार तसे मनन, चिंतन. जसे चिंतन तसा व्यवहार. म्हणून आहार-शुद्धीला आध्यात्मिक मूल्य! गीता सांगते, हे अन्न आमच्या मानसिक, प्राणिक, भौतिक शरीरावर घडून येणाऱ्या त्याच्या परिणामानुसार सात्त्विक, राजसिक व तामसिक वर्गात मोडते. सात्त्विक वृत्ती स्वभावतः अशा अन्नाकडे वळतात की जे मन, प्राण, शरीर यांच्या सुखात, समाधानात, स्वास्थ्यात भर घालते. जे स्निग्ध, मृदू, स्थिर आणि तृप्ती देणारे असते आणि म्हणून ते सात्त्विक वर्गात मोडते. राजसिक वृत्ती स्वभावतः जे अन्न पसंत करते, ते अतिशय आंबट, तिखट, उष्ण, जड, दाहक... असते. असे अन्न शारीरिक अस्वास्थ्य वाढवते. शरीर व मन यांचे रोग निर्माण करते. तामसिक वृत्ती थंडगार, अशुद्ध, शिळे, नासलेले, बेचव खाद्य खाण्यात आणि पशूप्रमाणे दुसऱ्यांचे उष्टे खाण्यात एक तऱ्हेचे विकृत सुख अनुभवते.

म्हणून आहार शुद्ध, परिमित असावा. जीवन चालविण्यासाठी अन्नाची गरज आहे. अन्नासाठी जीवन नाही. जिभेला सैल सोडणारी माणसे मनानेही चंचल असतात. चांचल्य आले की, सहनशक्ती संपते. सहनशक्ती जशी कमजोर होईल तसा क्रोध अवतरलाच म्हणून समजायचे. म्हणून बुद्धी भ्रष्ट करणारे, विचार नष्ट करणारे, धैर्यहीन करून दुर्बल बनविणारे व प्रसन्नता नष्ट करणारे खाद्य असो अथवा पेय असो हे वर्ज्य समजले पाहिजे. असे अन्न मनुष्यत्व नष्ट करून पशुत्वाकडे नेणारे असते. उपनिषदांनीसुद्धा हाच विचार मांडला आहे. जसे अन्न असते तसेच मन बनते. ''अन्नमयं हि सोम्य मनः ।'' (छंदोग्य ६।५।४). अन्नातील सूक्ष्म रसानेच मन, वीर्य, रक्त बनते. म्हणून अंतःकरणाच्या शुद्धीसाठी भोजन शुद्ध, पवित्र असावे. ''आहारशुद्धौ

सत्त्वशुद्धिः" असे म्हणून छांदोग्य उपनिषदाने आहाराची महती वर्णन केली आहे. गीतेनेसुद्धा अन्यत्र (अ. ९।२६, अ. ४।२४) ब्रह्मार्पण भावनेने भोजन करावे असे म्हटले आहे. प्रसन्न चित्ताने व स्वच्छ आसनावर, पवित्र वातावरणात आहार घ्यावा. एवढेच नव्हे तर भोजन बनविणाऱ्याचेसुद्धा विचार, वृत्ती सात्त्विक असाव्यात.

'यज्ञ'सुद्धा तीन प्रकारचे आहेत - सात्त्विक, राजसिक व तामसिक. गीतेने यज्ञाची व्याप्ती अधिक स्पष्ट केली आहे. संपूर्ण जीवनच यज्ञमय करून पुन्हा ते सारे ईश्वरार्पण करावयाचे हा गीतेचा आग्रह आहे. ज्यांचे जीवन यज्ञमय आहे, ते "सर्वभूतहिते रताः" होऊन आत्मौपम्य दृष्टीने सारे व्यवहार करतात. श्रद्धा व यज्ञातील शुद्ध विधीनुसार या यज्ञाचे तीन भेद येथे भगवंत कथन करीत आहेत. फळाची आकांक्षा न ठेवता व यज्ञ करणे हे माझे कर्तव्य आहे असे समजून, मनापासून, शास्त्रसम्मत व विधिपूर्वक जो यज्ञ होतो, तो सात्त्विक होय. पण फळावर ध्यान ठेवून तसेच दंभासाठी जे यज्ञ करतात ते राजस यज्ञ समजावेत. आणि शास्त्रविधिरहित, मंत्र, दक्षिणा व श्रद्धारहित यज्ञाला तामस यज्ञ म्हणावे, असे भगवंतांनी अर्जुनाला सांगितले.

सात्त्विक याज्ञिक आहुती देताना, सर्वांच्या कल्याणाची भावना ठेवून पवित्र अंतःकरणाने यज्ञ करतो, तर राजसिक स्वतःच्या कामना पूर्ण करण्यासाठी, मान-मतराब मिळविण्यासाठी प्रदर्शनी व दांभिक स्वरूपाचा यज्ञ करतो. तामसिक याज्ञिक शास्त्रविधीकडे पूर्णपणे डोळेझाक करतो. त्यांच्या यज्ञाचे अनुष्ठान दोषपूर्ण असते, मंत्रांचे उच्चार शास्त्रसम्मत नसतात, अश्रद्धेने व दक्षिणा देण्याचा विधी पूर्ण न करता हे यज्ञ होतात. त्यामुळे अशा यज्ञापासून कोणतेही मंगल घडत नाही व फलप्राप्ती होत नाही. वैदिक मंत्रोच्चारण शुद्ध व शास्त्रानुसार होत नसल्याने मंत्राचा प्रभाव पडत नाही. महाभारतकार व्यासांनी यज्ञाला व्यापक स्वरूप दिले आहे. भुकेलेल्याला अन्न देणे, पीडितांची सेवा करून सर्वांवर प्रेम करणे अशा परोपकारालासुद्धा यज्ञ म्हटले आहे. वेगवेगळ्या यज्ञांसाठी वेगवेगळे विधी सांगितले गेले आहेत. यज्ञकुंड, पात्र, बसण्याचे आसन, दिशा, वेगवेगळ्या देवतांची वेगवेगळी सामग्री हे जर विधिवत असेल तरच तो यज्ञ सात्त्विक होऊन त्यापासून फलप्राप्ती होते.

भगवान श्रीकृष्ण पुढील श्लोकात तपाचे तीन भेद सांगत आहेत -

**देवद्विजगुरुप्राज्ञपूजनं शौचमार्जवम् ।**
**ब्रह्मचर्यमहिंसा च शारीरं तप उच्यते ।।१४।।**



**अनुद्वेगकरं वाक्यं सत्यं प्रियहितं च यत् ।**
**स्वाध्यायाभसनं चैव वाङ्मयं तप उच्यते ।।१५।।**
**मनःप्रसादः सौम्यत्वं मौनमात्मविनिग्रहः ।**
**भावसंशुद्धिरित्येतत्तपो मानसमुच्यते ।।१६।।**

"देव, ब्राह्मण, गुरू व विद्वान यांचे पूजन, शुचिर्भूतपणा, सरळपणा, ब्रह्मचर्य व अहिंसा यास शारीर म्हणजे कायिक तप म्हणतात." ।।१४।।

"(मनाला) उद्वेग न देणारे, सत्य, प्रिय व हितकारक असे जे भाषण ते, मिळालेल्या ज्ञानाची उजळणी करून नवे ज्ञान मिळविणे, हे वाणीचे तप होय." ।।१५।।

"मन प्रसन्न ठेवणे, शांतपणा, भगवंताचे चिंतन, मनाचा निग्रह, शुद्ध भावना यांस मानस तप म्हणतात." ।।१६।।

'तप म्हणजे सहन करणे, तप म्हणजे झिजणे.' मनुष्य जे सहन करतो त्याला तप म्हणतात. ज्या साधनांद्वारे तप केले जाते त्यांच्या गुणवत्तेनुसार तपाचे तीन प्रकार होतात. देवता, द्विज, गुरू, ज्ञानी, ध्यानी अशा लोकांचा सन्मान करणे, त्यांची पूजा करणे, पवित्र व सरळवृत्तीने राहून ब्रह्मचर्य व संयमाचे पालन करणे, हिंसा न करणे हे सर्व शारीर म्हणजे कायिक तप आहे. ही सेवा करत असताना क्रोध, द्वेष, अहंकार न ठेवता, ती श्रद्धेने केली तर ते तप होते. खरे म्हणजे आपण दुसऱ्यांच्या बाबतीत जसे चिंतन करत असतो, नेमके तेच चिंतन दुसरेही आपल्याबाबतीत करत असतात. म्हणून नेहमी शुभचिंतन करावे. बुमरँगसारखे आपल्यावरच पुन्हा ते येऊन आदळत असल्यामुळे सतत प्रेमाचे प्रक्षेपण करावे. म्हणजे आपल्यालाही पुन्हा प्रेमच मिळते. तपाने आपल्या आंतरिक शक्ती जागृत होतात. सुप्त शक्ती जितक्या जागृत होतील, तेवढे मोठेपण मनुष्याला मिळते. जगाच्या इतिहासात सर्व महान पुरुषांनी आपल्या जीवनात तप केले आहे. विपरीत परिस्थितीमध्येसुद्धा सहनशक्ती टिकवून आंतरिक बळ वाढविणे हे सुद्धा एक तपच आहे. सोन्याला शुद्ध होण्यासाठी अग्निदिव्य करावे लागते व लोखंडालासुद्धा जर एखादा आकार द्यायचा असेल तर पुनःपुन्हा अग्नीत उलटे-पालटे व्हावे लागते. म्हणून अचानक उद्भवणारी संकटांची मालिका किंवा सोसावे लागणारे दुःख यांत तपाची साधना आहे. जिथे ही तपाची शक्ती नसते, तिथे दुर्बलता, भय निर्माण होते. प्रत्येक मनुष्यात दिव्यता, प्रचंड ऊर्जा असते. ती जागृत करण्यासाठी तपाची आवश्यकता आहे. यासाठी सतत सत्संग करून दिव्य पुरुषांच्या दैवी गुणांचे अनुकरण केले पाहिजे.

हा सत्संग जर योग्यवेळी मिळाला नाही तर आयुष्य दिशाहीन होऊन भरकटले जाते. श्रद्धा म्हणजे दृढ विश्वास. आपल्यापेक्षा श्रेष्ठ लोकांच्या वचनावर विश्वास ठेवून योग्य ते निर्णय घेतले पाहिजेत. श्रद्धा व अंधश्रद्धा यातील सीमारेषाही स्पष्ट आहे. चुकीच्या ठिकाणी विश्वास ठेवणे म्हणजे अंधश्रद्धा. मनुष्याचे जीवन श्रद्धेने फुलते पण अंधश्रद्धेने डागाळते. श्रद्धा ही जीवन रसमय करते व अंधश्रद्धा जीवन उखडून टाकते. डोळस श्रद्धेने व्यक्तींचा स्वीकार केला पाहिजे. ज्यांच्यासाठी आयुष्य वेचायचे, तेच जर पथभ्रष्ट असतील तर आपल्या तरी जीवनाचे काय होणार? यासाठी महाभारतातील महाप्रतापी पुरुष कर्ण, याचे उदाहरण सतत डोळ्यांसमोर असावे. सत्संग मिळाला नाही व चुकीच्या ठिकाणी श्रद्धा ठेवल्यामुळे अधःपतन कसे घडते याचे हे बोलके उदाहरण आहे. अनंत गुणांनी मंडित व महान शक्तिशाली अशा तेजस्वी कर्णाचे शौर्य इंद्रालाही लज्जित करील असे होते. विश्वातील मानवांना दातृत्वाची उपमा देण्यासाठी एकच व्यक्ती आहे, ती म्हणजे कर्ण! शौर्याने औदार्य फुलते व औदार्याने शौर्याला मूल्य येते. इंद्राने कवचकुंडले मागितली आणि त्याने ती काढून दिली. कवचकुंडले काढून दिली तर आपला मृत्यू निश्चित आहे हे माहीत असताना! स्नेह व मैत्रीचा आदर्श पाहिल्यानंतर श्रीकृष्णांनी कर्णासमोर सत्ता, संपत्ती, कनक आणि कान्तेचा मोह दाखविला तरीही तो चलित झाला नाही. अनेक प्रलोभने दाखविली गेली पण कर्ण दुर्योधनाच्या मैत्रीपासून ढळला नाही. या संगतीने त्याचे सर्व सद्‌गुण मातीमोल झाले. गुणांचा हिमालय जगाच्या दृष्टीने क्षुद्र बनला. वीरोचित जीवन त्याला जगायला मिळाले नाही, पण वीरोचित मरणही मिळाले नाही. रथाचे एक चाक जमिनीत रुतलेले असताना कृष्ण अर्जुनाला म्हणाले, ''मार त्याला!'' कर्ण नियतीच्या लीलेचा शिकार बनला. ह्याचे एकच कारण की, कर्णाला संग चांगला मिळाला नाही. जन्मजात चुकीचा व वाईट संग लाभला. संग कसा करायचा हा प्रारब्धाचा किंवा दैवाचा भाग नाही. तर ती माणसाच्या कर्तृत्वाची गोष्ट आहे. कर्णाने चुकीच्या ठिकाणी श्रद्धा ठेवल्या. कृतज्ञता दाखविण्यासाठी सारे जीवन पणाला लावले. असंगाच्या ठिकाणी ही कृतज्ञता दाखविल्याने कर्णाच्या आयुष्याची होरपळ झाली.

''महाजनो येन गतः स पन्थाः'' ज्या मार्गाने महान पुरुष गेले, त्या मार्गाचे अनुकरण केले पाहिजे. हेच प्राज्ञपूजन! जशी अर्जुनाने गुरू द्रोणाचार्यांची सेवा केली, अशी सेवा करणे म्हणजे तप. हे सर्व करताना ब्रह्मचर्याचे पालन तशीच शुद्धता, सरळपणा व अहिंसा अंगी बाणावी लागते.



ज्या वाणीत ज्ञान, प्रसन्नता, शांती, शीतलता यांचा मेळ असतो, ते वाणीचे तप असते. तिथे उद्वेगकारी शब्द नसतात, असत्याचा मागमूस नसतो, तर केवळ दुसऱ्यांच्या हिताचा विचार असतो. अशी वाणी सत्य धारण करणारी असते, मंथरा, शकुनी, शिशुपाल, दुर्योधन अशांच्या वाणीने महाभारत-रामायण घडले. रामायणात एका धोब्याने सीतेच्या चारित्र्याविषयी अनुदार उद्‌गार काढले व पुढे केवढे मोठे दिव्य सीतेला करावे लागले! आपल्या वाणीला उत्तम-उत्तम ग्रंथांचे वाचन करून सजविली पाहिजे. शब्दा-शब्दातून ज्ञानामृत प्रगट व्हावे, तेव्हा ते वाणीचे तप होते. यासाठी स्वाध्यायाची सतत आवश्यकता असते.

मनात सदैव प्रसन्नता, मृदुता, माधुर्य, शिष्टता, शालीनता यांनी युक्त होऊन भगवंताचे शुद्ध भावनेने चिंतन करणे व मनोनिग्रह साधणे हे मानसिक तप आहे. भाव-संशुद्धी म्हणजे विचारांची पवित्रता! केवळ उदात्त विचारच मनुष्याला तारतात. विचारांनी माणूस घडतो. महापुरुषांचा सत्संग आणि स्वाध्याय म्हणजे ग्रंथाचे पठन-पाठन हे सर्व करायचे ते विचार समृद्ध करण्यासाठी. विचारांनीच मनुष्याची आंतरिक स्थिती बदलते, मनाची स्थिती बदलते. ज्याने मन जिंकले त्याने जग जिंकले. मनोनिग्रह करून आंतरिक शक्ती समृद्ध झाली तर तो ज्ञानी, ध्यानी बनू शकेल. मनावर जर नियंत्रण प्राप्त झाले तर मौन, प्रसन्नता, मृदुता, शांती हे सर्व काही साध्य होते पण मन अशांत, चंचल असेल तर तिथे प्रसन्नता कशी राहील? सतत प्रेमपूर्ण, प्रसन्न राहून आत्मचिंतन करणे हे मानसिक तपच आहे. हे सर्व स्वभावात दृढ होणे अथवा तशी वृत्ती होणे म्हणजे ते तप... तीच साधना... व तोच जप... तीच भक्ती.

भगवान श्रीकृष्णांनी तपाचे कायिक, वाचिक व मानसिक असे तीन भेद १४ ते १६ या श्लोकांतून वर्णन केले. आता तपाच्या अंगभूत वृत्तींच्या दृष्टीने सात्त्विक, राजस व तामस असे त्यांचे तीन भेद आणि दानाचेही तीन भेद वर्णन करीत आहेत.

**श्रद्धया परया तप्तं तपस्तत्त्रिविधं नरैः**
**अफलाकांक्षिभिर्युक्तैः सात्त्विकं परिचक्षते ।।१७।।**
**सत्कारमानपूजार्थं तपो दंभेन चैव यत् ।**
**क्रियते तदिह प्रोक्तं राजसं चलमध्रुवम् ।।१८।।**
**मूढग्राहेणात्मनो यत्पीडया क्रियते तपः ।**
**परस्योत्सादनार्थं वा तत्तामसमुदाहृतम् ।।१९।।**

**दातव्यमिति यद्दानं दीयतेऽनुपकारिणे ।**
**देशे काले च पात्रे च तद्दानं सात्त्विकं स्मृतम् ।।२०।।**
**यत्तु प्रत्युपकारार्थं फलमुद्दिश्य वा पुनः ।**
**दीयते च परिक्लिष्टं तद्दानं राजसं स्मृतम् ।।२१।।**
**अदेशकाले यद्दानमपात्रेभ्यश्च दीयते ।**
**असत्कृतमवज्ञातं तत्तामसमुदाहृतम् ।।२२।।**

"हे तीनही प्रकारचे तप फलाची आकांक्षा न ठेवता अत्यंत श्रद्धेने व योगयुक्त बुद्धीने मनुष्यांनी केले म्हणजे त्यास सात्त्विक तप म्हणतात." ।।१७।।

"आपला सत्कार, मान किंवा पूजा व्हावी म्हणून ढोंगीपणाने जे तप केले जाते, ते राजस तप होय. हे क्षणिक फल देणारे असून त्याचे फळ मिळेलच याची खात्री नसते." ।।१८।।

"चुकीच्या कल्पनांनी स्वतःला पीडा देऊन जे तप केले जाते किंवा जारण-मरणादी कर्मांनी दुसऱ्यांच्या नाशासाठी जे तप करण्यात येते, ते तामस तप होय." ।।१९।।

"दान करणे आपले कर्तव्य आहे अशा बुद्धीने आपल्यावर उपकार न करणाऱ्याला योग्य ठिकाण, योग्य वेळ पाहून जे दान दिले जाते, ते सात्त्विक दान होय." ।।२०।।

"परंतु जे परतफेडीच्या अपेक्षेने किंवा दुसरे काही फळ मिळावे म्हणून मनात नसूनही दान दिले जाते, ते राजस दान होय." ।।२१।।

"अयोग्य स्थळी, अकाली किंवा अपात्री तिरस्कारपूर्वक जे दान दिले जाते, ते तामस दान समजावे." ।।२२।।

श्रेष्ठ ज्ञानयुक्त श्रद्धेने सात्त्विक तपस्या केली जाते. आत्मसंयम आणि स्वतःच्या प्रकृतीत सुसंवादित्व निर्माण करणे हे या तपस्येचे काम असते. यात स्वभावशुद्धी, सौम्यपणा, प्रसन्नता, संयम, मौन हे गुण येतात. सात्त्विक तपस्येत राजसिक अहंकारी प्रकृतीला नियंत्रणाने शांत करणारे व तिच्या जागी सदाचाराचे सुखद व शांत तत्त्व प्रस्थापित करणारे सर्व काही येते. प्राचीन भारतीय संस्कृतीत अतिशय मौल्यवान मानला गेलेला तपस्यारूप सात्त्विक धर्म तो हाच! आपल्या संस्कृतीचा सात्त्विक तप हा प्राण आहे. विश्वाच्या पाठीवर अनेक संस्कृती आल्या व नष्ट झाल्या. नील नदीच्या काठची मिसरी, तैग्रीस व युफ्रेटीस यांच्या खोऱ्यातील सुमेरिअन त्याचप्रमाणे असिरियन व बॅबीलोनियन... अशा विश्वविख्यात संस्कृती नष्ट झाल्या पण भारतीय संस्कृती अनेक परकीय आक्रमणे येऊनसुद्धा टिकून आहे. ह्याचे



कारण आपल्या ऋषी-मुनींनी सात्त्विक तपाची महती स्वतःच्या अनुभूतीने सिद्ध केली व ती लोकांच्या मनावर संस्कारित केली. सात्त्विक तपाचे तीन प्रकार गीतेने सांगितले आहेत. प्रथम शारीर तप किंवा बाह्य कर्मांचे तप, शरीराची शुद्धी, सरळ व्यवहार, अहिंसा, ब्रह्मचर्य, कर्माची शुद्धी हे सर्व शारीरिक तपात येते. नंतर वाचेचे तप. वेदादी ग्रंथांचे अध्ययन, सत्य, हितकारी भाषण तसेच उद्वेगकारक संभाषणाचा त्याग हे या तपात येते. शेवटचे तप म्हणजे नैतिक पूर्णतेचे व चित्तशुद्धीचे मानसिक तप. सात्त्विक भाव ठेवून, आत्यंतिक श्रद्धेने, भगवत्परायण होऊन हे तप केले जाते. मानवजातीच्या कल्याणासाठी भगवंतांनी गीता सांगितली. त्यामुळे संपूर्ण गीतेत सात्त्विक तपाचा, गुणांचा स्वीकार व राजस-तामस यांचा अग्राह्य म्हणून त्याग हे वारंवार भगवंतांनी सांगितले आहे.

जे तप सत्कार, मान, पूजा यासाठी केले जाते, ते नाशिवंत, अस्थिर असते. सात्त्विक तपाचे फळ ऊर्ध्वलोकी तसेच इहलोकीही मिळते. पण राजस तपाचे फळ याच लोकी पण अल्पकाळ टिकणारे असते. फलेच्छा ठेवूनच केलेली पूजा ही केवळ दांभिक कृती ठरते. त्यामुळे अशा तपात भावशुद्धी राहत नाही.

मूढता व दुराग्रहपूर्वक, मन, शरीर, वाणी यांना पीडा देऊन किंवा दुसऱ्याचे अनिष्ट करण्याच्या हेतूने केले जाते ते तामस तप! तामसिक तपस्या भ्रमात्मक कल्पनेने केली जाते. संकुचित, अशास्त्रीय व स्वार्थी हेतूने केलेले असे तप करणाऱ्यालाही दुःखदायक ठरते.

तपस्येप्रमाणे दानसुद्धा अज्ञानप्रसूत म्हणजे तामसिक; दम्भप्रसूत म्हणजे राजसिक; व निःस्वार्थी व ज्ञानविभूषित स्वरूपाचे म्हणजे सात्त्विक असते. दान देणे हे कर्तव्य आहे ह्या बुद्धीने, त्याबद्दल काही मोबदला मिळेल ही आशा न ठेवता, योग्य स्थळी, योग्य वेळी, योग्य व्यक्तीला जे दिले जाते ते सात्त्विक दान! "ईशावास्यमिदं सर्वं... तेन त्यक्तेन भुञ्जीथाः" ही भावना सतत ठेवून ही कृती करायची. मला मिळालेले सर्व काही भगवंताचे आहे, त्यांची वस्तू त्यांनाच अर्पण करीत आहोत, ही वृत्ती सात्त्विक दानात असते. त्यामुळे पुण्याची अभिलाषा ठेवून किंवा कोणत्याही परतफेडीच्या भावनेने हे दान केले जात नाही. ज्याच्याकडे जी वस्तू नाही, अशा अभावग्रस्ताला ते दान योग्य वेळी केले जाते.

परंतु परत मिळावे ह्यासाठी किंवा फळाच्या आशेने जे दिले जाते त्याला राजसिक दान म्हणतात. जे दिले जाते ते सुद्धा अत्यंत क्लेशपूर्वक! गावात विहीर खोदायची किंवा अन्नदान करायचे पण मनात हेतू ठेवून... भविष्यात

होणाऱ्या निवडणुकीचा हेतू बाळगून! दान केल्याने पुण्य मिळते, उत्तम गती मिळते ही भावना ठेवून केलेले दानसुद्धा राजस दान होय.

जे दान तिरस्काराने व अयोग्य ठिकाणी वा अयोग्य काळी कुपात्राला दिले जाते त्याला तामस दान म्हणतात. असे दान शास्त्रसम्मत विधींचा विचार न करता मन मानेल त्याप्रमाणे दिले जाते.

अशा तऱ्हेने श्रद्धेच्या स्वरूपाबद्दल सांगताना, मानवी जीवनाला मूलभूत असलेल्या म्हणजे श्रद्धा व श्रद्धेचे प्रकार आणि तसेच आहार, यज्ञ, तप व दान यांचे विविध भेद भगवंतांनी सांगितले. आता भगवान श्रीकृष्ण जीवनाच्या उन्नतीचा सुलभ मार्ग समजावत आहेत. यज्ञ, तप, दान... अशा क्रिया सद्‌गुणसंपन्न व शास्त्रविधिपूर्वक गुणण्याचा हा मार्ग आहे. यज्ञमय जीवन करून पुन्हा ते ईश्वरार्पण करावयाचे हा गीतेचा उपदेश आहे. ते तसे करण्याची युक्ती भगवंतांनी पुढील श्लोकांतून केली आहे -

**ॐतत्सदिति निर्देशो ब्रह्मणस्त्रिविधः स्मृतः ।**
**ब्राह्मणास्तेन वेदाश्च यज्ञाश्च विहिताः पुरा ।।२३।।**
**तस्मादोमित्युदाहृत्य यज्ञदानतपःक्रियाः ।**
**प्रवर्तन्ते विधानोक्ताः सततं ब्रह्मवादिनाम् ।।२४।।**
**तदित्यनभिसंधाय फलं यज्ञतपः क्रियाः ।**
**दानक्रियाश्च विविधाः क्रियन्तेमोक्षकांक्षिभिः ।।२५।।**
**सद्भावे साधुभावे च सदित्येतत्प्रयुज्यते ।**
**प्रशस्ते कर्मणि तथा सच्छब्दः पार्थ युज्यते ।।२६।।**
**यज्ञे तपसि दाने च स्थितिः सदिति चोच्यते ।**
**कर्म चैव तदर्थीयं सदित्येवाभिधीयते ।।२७।।**
**अश्रद्धया हुतं दत्तं तपस्तप्तं कृतं च यत् ।**
**असदित्युच्यते पार्थ न च तत्प्रेत्य नो इह ।।२८।।**

''ॐ तत सत' ही परब्रह्माची तीन नावे आहेत. याच नामनिर्देशाने पूर्वी (प्रजापतीने) ब्राह्मण, वेद व यज्ञ निर्माण केले.'' ।।२३।।

''म्हणून वेद जाणणाऱ्यांची यज्ञ, दान व तप इ. शास्त्रोक्त कर्मे ॐ असे म्हणून नेहमी सुरू होत असतात.'' ।।२४।।

''मोक्षाची इच्छा करणारे लोक 'तत्' असे म्हणून फळाची इच्छा न ठेवता यज्ञ, तप व दान वगैरे अनेक प्रकारच्या क्रिया करीत असतात.'' ।।२५।।

''अस्तित्व आणि साधुत्व म्हणजे चांगलेपणा दाखविण्याकरिता 'सत्'



हा शब्द योजला जातो. आणि हे अर्जुना! चांगल्या कर्माकरताही 'सत्' शब्द योजला जातो.'' ।।२६।।

''यज्ञ, दान, तप यांच्याविषयी जी स्थिर भावना असणे यालाही सत् असे म्हणतात. तसेच त्यासाठी करावयाच्या कर्मालाही 'सत्' असेच म्हणतात.'' ।।२७।।

''श्रद्धा न ठेवता जे हवन केले जाते, दान दिले जाते, तप केले जाते किंवा कोणतेही कर्म केले जाते, त्याला 'असत्' असे म्हणतात. हे पार्था! इहलोकी किंवा परलोकी त्यांच्यामुळे काहीही लाभ होत नाही.'' ।।२८।।

परब्रह्माच्या स्वरूपाबद्दल मनुष्याला जे काही ज्ञान प्राप्त झाले आहे ते सर्व 'ॐ तत् सत्' या तीन शब्दांमध्येच आहे. 'ॐ तत् सत्' या संकल्पानेच ब्राह्मण, वेद व यज्ञ यांची ब्रह्मदेवाने सृष्टीच्या आरंभी निर्मिती केली.

ॐ या पदामधील अ, उ, म ही अक्षरे क्रमशः स्थूल, सूक्ष्म आणि अतिचेतन पुरुष दाखवतात. आणि संपूर्ण ॐ पद हे ब्रह्माची चौथी अवस्था, तुरीय किंवा केवलब्रह्म याचे वाचक आहे. श्री ज्ञानेश्वरमाऊली गणपतीचे नमन करताना म्हणतात की, अ कार म्हणे गणेशाचे पाय, उ कार म्हणजे त्याचे पोट व म कार म्हणजे त्याचे मस्तक. यज्ञ, दान, तप यांच्या संबंधी कोणतीही क्रिया करताना आरंभी ॐ म्हणतात. ॐ या उच्चाराने ती क्रिया शास्त्रोक्त व स्वीकार्य होते आणि निर्विघ्नपणे पार पडते.

परमात्मा सृष्टीच्या आधी होता, आजही आहे, उद्याही असेल. तो अज, अमर, चिरंतन, शाश्वत असा आहे. सारी सृष्टी ही त्यानेच भरून राहिली आहे, म्हणून सृष्टी ही त्याचे पूजाद्रव्य, पूजासाधन आहे. विष्णुमय जग समजून सारे भेदाभेद नष्ट करायचे व सर्व भूतमात्रात त्या परमात्म्याचे दर्शन घ्यायचे. आत्मौपम्य दृष्टीने सर्व चराचर सृष्टीत त्याचे दर्शन घ्यायचे व 'सोऽहं' साधनेने स्वतःकडे पाहायचे. जीव, जगत् व जगदीश्वर हे सर्व एकच आहे याची अनुभूती घेणे म्हणजे 'ॐकारभाव अंतरी मुरला', असे होईल. साधकाने प्रथम स्वतःचा या सृष्टीशी असा मेळ घालायचा व त्यानंतर सृष्टीही परमात्म्याचीच अभिव्यक्ती आहे या भावनेने परमात्म्याशी एकत्वाचे नाते जोडायचे हे 'ॐ तत सत' या मंत्राने सुचविले आहे.

'सत्' या शब्दाची भगवंतांनी इथे पाच प्रकारची व्याख्या केली आहे. (१) 'सत' म्हणजे सत्य म्हणजे अस्तित्व, (२) 'सत्' म्हणजे श्रेष्ठ भाव, साधुता, (३) यज्ञ, दान, तपरूपी प्रशंसनीय क्रियांमध्ये निष्ठा असणे याला

'सत्' असे म्हणतात, (४) सर्व चांगली, शुभ कर्मे 'सत्' वर्गात मोडतात, (५) परमात्म्यासाठी केलेली सर्व कर्मे 'सत्' शब्दात अंतर्भूत आहेत.

परमात्मा सत् आहे म्हणजे शुभ, मंगल आहे. म्हणून संपूर्ण सृष्टीत त्या मांगल्याचे, सत्याचे दर्शन घ्यायचे. परमेश्वराचे हे असे मंगलरूप असल्यामुळे आपणही अंतर्बाह्य निर्मळ, शुद्ध होऊन आपल्या सर्व क्रियासुद्धा तशाच शुद्ध, पवित्र करून ईश्वराला अर्पण करायच्या हे या 'सत्' शब्दाने निर्देशिले आहे. दैवी संपत्तीतील सत्य, अभय, अहिंसा, त्याग, क्षमा अशा सर्व गुणांसाठी 'सत्' शब्दाचा वापर केला जातो. सत्-सत्त्व, सद्‌गुण, सद्‌भाव, सदाचार, सद्‌व्यवहार, सत्कर्म... अशा शब्दांतून श्रेष्ठ आचरणाचा भाव व्यक्त होतो.

'तत्' म्हणजे ते. परमात्मा सृष्टीत असूनही निराळा आहे. सृष्टीच्या सर्व व्यापारांपासून 'ते' तत्त्व जसे निराळे आहे, तसे साधकानेसुद्धा आपल्या कर्मात अनासक्त राहून निष्काम भावाने सर्व जीवनच यज्ञमय, सेवामय आणि ईश्वराला समर्पित करायचे. तेव्हाच 'तत्' हे परमात्म-तत्त्व जीवनात उतरते. ही सृष्टी परिवर्तनशील आहे पण परमात्म्याची सत्ता नित्य-निरंतर आहे. निर्देश करण्यासाठी 'तत्' उच्चार करून निष्कामभावाने जे भगवंताला आपली कर्मे अर्पण करतात ते ब्रह्मवादी. त्यांची दृढ श्रद्धा अशी असते की, भगवंताच्या शक्तीनेच हे सारे काही घडते. म्हणून 'तत्' उच्चारून यज्ञ, दान, तप अशी सर्व कर्मे ते करतात. हळूहळू ते परमेश्वरात इतके रमून जातात की त्यांचे सर्व संकल्प आपोआप परम सात्त्विक होऊ लागतात... जणू स्वयं परमेश्वरच त्यांचे सर्व संकल्प करत असतो.

अशा प्रकारे 'ॐ तत् सत्' हा वैदिक मंत्र घेऊन गीतेने ईश्वरमय जीवन जगणे शिकविले आहे. ईश्वराच्या कोणत्याही नामात मनुष्याला उन्नत करण्याची शक्ती असते. फक्त ते नाव शुद्ध अंतःकरणाने व श्रद्धायुक्त भावनेने घ्यावे. म्हणून या अध्यायाच्या शेवटी भगवान सांगतात की, जर यज्ञ, दान, तप आदी श्रद्धापूर्ण भावाने ईश्वराप्रीत्यर्थ केलीत तर ती 'सत्' ठरतील. श्रद्धा हे आमच्या अस्तित्वाचे अंतरंग तत्त्व असल्याने, श्रद्धेवाचून ही सर्व कर्मे केल्यास ती व्यर्थच ठरतात. इहलोकी अथवा परलोकीसुद्धा यातून कोणताही लाभ होत नाही. श्रद्धाहीन कर्मात असे कोणतेही सत्त्व राहत नाही की, ज्यामुळे मनुष्यास उत्तमगती प्राप्त होईल. काही वेळा पुष्कळ तप घडते, खूप दान दिले जाते, यज्ञसुद्धा मोठ्या प्रमाणावर केले जातात. पण हे सर्व जर अश्रद्धेने केले असेल तर ते परमात्म्याला पोहोचत नाही. इहलोकात क्षणिक मान-मतराब, प्रतिष्ठा कदाचित मिळवून देतील पण श्रेयःप्राप्तीसाठी ही कर्मे दुबळी ठरतात.



सतराव्या अध्यायात, भगवंतांनी मनुष्याला त्याच्या अंतिम कल्याणाचा मार्ग दाखविला आहे. श्रद्धेचे तीन प्रकार सांगून सात्त्विक श्रद्धेची स्वीकृती व राजस-तामस श्रद्धेचा त्याग करण्यासाठी दैवी मार्गदर्शन केले आहे. म्हणून या अध्यायाचे ''श्रद्धात्रयविभागयोग'' हे नाव सार्थ ठरले आहे. आंतरिक चित्तशुद्धीने व श्रद्धेने सात्त्विक कर्मे करून संपूर्ण जीवन यज्ञमय करायचे व ते सारे ईश्वरार्पण करावयाचे हा गीतेचा संदेश भगवान श्रीकृष्णांनी पुन्हा एकदा या अध्यायाच्या रूपाने सांगितला आहे.

**|| श्रीकृष्णार्पणमस्तु ||**

## अध्याय अठरावा
## मोक्षसंन्यासयोग

अठरावा अध्याय हा गीतारूपी वैष्णवमंदिराचा कळस आहे असे श्री ज्ञानेश्वर महाराज म्हणतात. हा अठरावा अध्याय नाही; तर ही 'एकाध्यायी' गीताच आहे असे माऊलीने यथार्थ म्हटले आहे. जेव्हा देवळात जाऊन देवाचे दर्शन घेणे जमत नाही, तेव्हा कळसाचे दर्शन घेऊन पुण्य पदरात पाडता येते. तसे अठराव्या अध्यायाचे माहात्म्य आहे. संपूर्ण गीतेचे सार या अध्यायात सामावलेले असल्याने, केवळ या अध्यायाच्या अभ्यासाने, गीतेचे गुह्यतम रहस्य समजणे सोपे झाले आहे. भगवत्पूज्यपाद श्रीशंकराचार्यांनीही अठराव्या अध्यायाबाबत आपल्या भाष्याच्या प्रारंभीच असे म्हटले आहे - "समस्त गीताशास्त्राच्या अर्थाचा ह्या अध्यायात उपसंहार करून, त्याबरोबरच सर्व वेदांचा सारार्थही सांगण्यासाठी या अध्यायाची योजना केली आहे. अठराव्या अध्यायावरील भाष्यास प्रारंभ करताना श्रीधरस्वामी म्हणतात की, "परमार्थविषयी निश्चित, निर्णायक सिद्धान्त सांगणाऱ्या अठराव्या अध्यायात भगवंतांनी संन्यास आणि त्याग असा विभाग करून, समग्र गीतेचा एकूण अर्थ अगदी असंदिग्धपणे कथन केला आहे." गीतेतील साधनेचे एकूण स्वरूप, जीव, जगत् जगदीश्वर याविषयीचे निश्चित स्वरूपज्ञान, सिद्धिप्राप्तीची नेमकी साधना व त्या सिद्धीचे स्वरूप व फळ याविषयीचे समग्र ज्ञान या अध्यायात ओतप्रोत भरले आहे. सर्व विषयांची एकवाक्यता करून सर्वोच्च सिद्धान्त सांगणारा हा उपसंहारात्मक अध्याय आहे. अठरा रत्नांचा हार जसा एकाच दोरीत ओवावा, तसे या अध्यायात संपूर्ण गीतोपदेश गुंफले आहेत.

या शेवटच्या अध्यायात भगवंतांनी संपूर्ण गीतेचे नवनीत भरले आहे. सारभूत स्वरूपात गीतेच्या सिद्धान्तांची पुनर्मांडणी केली आहे. गीतेवर टीका करणाऱ्यांचा एक रोख नेहमी असा असतो की, गीतेत पुनरुक्तीचा दोष भरला आहे. हे म्हणणे तसे खरे आहे. पण त्यामागील उद्देश समजून घेणे



गरजेचे आहे. चांगली व उदात्त गोष्ट पुनःपुन्हा सांगितल्याशिवाय पटत नाही. उत्तम विचार वारंवार पेरावे लागतात. मनावर ठसण्यासाठी काही वेळा पुनरुक्ती आवश्यक असते.

गीतेचे विचार जीवनात आले पाहिजेत. हे विचार समजून घेऊन आपले जीवन बदलले पाहिजे. वृत्ती बदलणे हीच भक्ती! हे विचार सर्वांसाठी आहेत. केवळ निवृत्तीनंतर वाचण्यासाठी गीता जीवनात येते. काही जण गीतेचे पूजन करतात तर काही जण मृत्यूनंतर गीता म्हणवून घेतात. म्हणणारे मिळाले नाहीत तर कॅसेट आहेच. बुद्धिमंतांनी गीता बाजूला ठेवली आहे. जितक्या लवकर गीतेचे विचार आपल्या जीवनात येतील तेवढे आपले जीवन अधिक तेजस्वी बनते. गीता समजली तर पुढील पाच गोष्टी तरी जीवनात आल्या पाहिजेत -

१) पुरुषार्थ किंवा पौरुषत्व
२) प्रसन्नता
३) भगवंताला आवडणारी भक्ती
४) अनहंकारिता
५) संयम

पौरुष हा शब्द केवळ पुरुषांसाठी नाही. स्त्री-पुरुष, बाल-तरुण अशा सर्वांसाठी तो वापरला आहे. पौरुष म्हणजे प्रयत्न, प्रतिकारशक्ती, निर्भयता, आक्रमकता व तेजस्विता. या सर्वांचे मिश्रण म्हणजे पौरुषत्व. जीवनात प्रत्येक गोष्टीसाठी प्रयत्न करावा लागेल. प्रयत्नांशिवाय मिळणारी कोणतीही फुकट गोष्ट मी स्वीकारणार नाही. हे तेज आपल्यात आले पाहिजे. इंग्लंडमध्ये १९४५ साली कामगारांच्या मुलांना मोफत जेवण द्यायचे सरकारने ठरविले. पण कामगारांच्या बायकांनी ते नाकारले. आपल्या येथे सर्वांनाच फुकट घेण्याची सवय लागली आहे. श्रीमंत बागायतदारही फुकट घेतो व गरीब शेतकरीही. असहाय्य लोकांनी मदत स्वीकारणे वेगळे पण गाडी, बंगला असूनसुद्धा शैक्षणिक सवलती मिळवायच्या यात पुरुषार्थ कसला? माणसे विकत घेण्याची प्रवृत्ती यातून निर्माण होते. देणारा धनको व घेणारा ऋणको असे झाल्यामुळे लाचारी जीवनात येते. रामाने तीन-तीन राज्ये परत केली. अयोध्या, किष्किंधा व लंकेचे राज्य अनासक्त बुद्धीने परत केले. कृष्णानेही तेच केले. तरी आपण रामभक्त व कृष्णभक्त छोट्या छोट्या मोहाला बळी पडतो. प्रलोभन त्यागण्याची प्रतिकारशक्तीच आपल्याजवळ नाही. म्हणूनच भ्रष्टाचारासारखी प्रकरणे बेसुमार वाढत आहेत. अमेरिकेत विवेकानंद असताना एक धनाढ्य, सुंदर युवती त्यांच्याकडे आली. तिने विवेकानंदांकडे याचना

केली, "मला तुमच्यासारखा तेजस्वी मुलगा पाहिजे. म्हणून तुम्ही माझ्याशी लग्न करा." विवेकानंद म्हणाले, "माझ्यासारखा का? मलाच मुलगा म्हणा ना!" ही प्रतिकारशक्ती व हे तेज ही आपली खरी परंपरा आहे. ही वृत्ती आली तरच सुखदुःखाकडे पाहण्याची समत्व दृष्टी येते. हीच गोष्ट अध्यात्म प्रांतातसुद्धा बोकाळली आहे. काहीच साधना न करता केवळ गुरुकृपेने, कुंडलिनी शक्ती जागृत करून मुक्ती मिळविण्याची केविलवाणी धडपड होते आहे. आठ दिवसांत आत्मदर्शन घडवून देण्याची आध्यात्मिक दुकाने आज सुरू झाली आहेत. अशा गुरू-शिष्यांची संख्या वाढत आहे. त्यामुळे भक्तीतील नेमके तत्त्वच हरविले आहे. भगवंतांनी गीतेत हे वारंवार सांगितले आहे. अंतःकरणशुद्धीचा मार्ग सांगितला आहे. मनाचे उदात्तीकरण, विभूतीकरण झाल्याशिवाय व बुद्धी शुद्ध झाल्याशिवाय भक्तीत काहीही प्राप्त होत नाही. संयम हा गीतेचा प्राण आहे. विकारांचे दमन व संयम झाल्याशिवाय ही शुद्धी होत नाही. माझ्या हृदयातच तो अंशरूपाने आहे. खरा पिता तो असल्यामुळे आपल्या पुत्राला, तो सतत फोन करत असतो. पण आपला फोन सतत एंगेज... निरनिराळ्या ठिकाणी गुंतलेला - नोकरी - बायको - नातेवाईक - गाडी - बंगला... त्यामुळे फोन लागतच नाही. 'मय्यावेश्य...' हे भक्तीचे वर्म आहे. मन व बुद्धी अर्पण केल्याशिवाय भक्ती जीवनात येऊ शकत नाही. तो भगवंत तुझ्यापासून वेगळा नाही हे गीता सांगते.

'प्रसादस्तु प्रसन्नता' - सुखदुःखात मनाचे समतोलत्व साधण्यात प्रसन्नता आहे. रामाला आदल्या दिवशी सांगण्यात येते की, उद्या रामाचा राज्याभिषेक होणार व दुसऱ्या दिवशी सकाळी सांगितले जाते की, रामाने १४ वर्षे वनवास स्वीकारायचा. दोन्ही वेळी रामाची प्रसन्नता ढळली नाही. प्रसन्नता हाच प्रसाद आहे. पहिल्या अध्यायात अर्जुन दुःखी आहे पण भगवंताच्या विचारांनी बदलून अठराव्या अध्यायात त्याने आपली प्रसन्नता व्यक्त केली आहे. गीतेचा प्रवास हा विषादापासून प्रसन्नतेकडे जाणारा आहे.

अहंकार सुटल्याशिवाय दिव्यत्वाची प्रचिती येत नाही. भगवंताच्या मंदिरात प्रवेश करताना किंवा संत-महात्म्यांकडे जाताना अहंकाराचे जोडे बाहेर काढून जायला पाहिजे. अहंकारावर स्वार होता आले पाहिजे. अहंकार उपरण्यासारखा केव्हाही काढून ठेवता आला पाहिजे. कातडीसारखा चिकटलेला असू नये. भगवंताच्या कृपेनेच माझे सर्व व्यवहार चालतात, तोच माझे जीवन चालवितो ही कृतज्ञता जीवनात आली की, अहंकाराचा नाश होतो. भगवान शंकराने जसे आपल्या कंठाभोवती नागाला ठेवले आहे तसे अहंकाराला ठेवता आले पाहिजे. 'निरहंकारी व निर्मम' होणे ही तेजस्वी भक्तीची लक्षणे आहेत.



गीतेने संयमाची शिकवण दिली आहे. भोग की त्याग यात, गीतेने समन्वयाची भूमिका घेतली आहे. भोगविषय भगवंतांनीच निर्माण केले आहेत. म्हणूनच दहा इंद्रियेही दिली आहेत. धर्माला अनुसरून भोग भोगावेत हा गीतेचा आग्रह आहे. भोगविषय ही केवळ भगवंतांनी दिलेली खेळणी आहेत. जन्मभर फक्त खेळण्यांतच रमू नये. विमानाने प्रवास करायच्या वेळी सुरुवातीला 'पट्टा बांधा' म्हणून आदेश दिला जातो. तसे भोगालाही पट्टा बांधता आला पाहिजे. आज भोगवाद व चंगळवाद यांनी बेसुमार थैमान मांडले आहे. त्यामुळे जीवन उद्ध्वस्त होत आहे. मनोविकारांनी तरुण, प्रौढ सर्वांनाच घेरले आहे. यातूनच नैराश्य, ताण-तणाव वाढून आत्महत्यांचे प्रमाण वाढले आहे. मधुमेह, हृदयविकार यामुळे तरुणांचेसुद्धा मृत्यूचे प्रमाण वाढले आहे. भोगवादाची परिसीमा झाल्यामुळे हे घडत आहे.

परवाच माझ्या मित्राच्या घरी घडलेली घटना खूप बोलकी आहे. मित्राला त्याच्या जवळच्या नात्यातील एका तरुण इंजिनीयरचा फोन आला. त्याने आपल्याच कॉलेजमधील मुलीशी प्रेमविवाह ठरविला. मुलीच्या आईवडिलांनी साखरपुड्याचा बेत रचला. या साखरपुड्याला माझा मित्र व त्याची पत्नी या उभयतांनी पौरोहित्याच्या वेळी आईवडिलांची भूमिका स्वीकारावी, हा त्याचा आग्रह होता. मी त्याचे कारण विचारले व त्यांनी जे सांगितले त्यामुळे माझ्याही मनाला खूप वाईट वाटले. मुलाचे आई-वडील पदवीधर व ब्राह्मण जातीतील. आई रूपाने चांगली व मोठ्या ऑफिसात नोकरी करणारी, वडीलही व्यवसाय करणारे. आईने एका उद्योगपतीच्या प्रेमात पडून दुसरे लग्न केले. अनधिकृत. वडिलांनीही तोच मार्ग स्वीकारला व मोठ्या शहरातल्या नोकरी करणाऱ्या मुलीशी लग्न केले. या नुकत्याच इंजिनीयर झालेल्या तरुणाच्या साखरपुड्यात दोघांनीही यायचे टाळले. म्हणून कळवळून, आपल्या मामा-मामीला आईवडिलांची भूमिका बजावण्यास निमंत्रित केले. मुलाचे भावविश्व किती कुरतडले असेल याची कल्पनाच करवत नाही.

मोहनिरास होणे हे गीतेचे तत्त्वज्ञान आहे. भोगाकडे संयमाने कसे पाहावे हे गीता शिकविते. घटस्फोटांचे प्रमाण वाढत आहे. अमेरिकन संस्कृतीतील टाकाऊ भाग आपण स्वीकारत आहोत. इथे वेळीच पायबंद घालण्यासाठी उदात्त विचार व संस्कार यांची गरज आहे.

या पाच गोष्टी जीवनात आल्या तर गीता आपल्या जीवनात आली असे होईल. मनुष्याला जी बुद्धीची देणगी आहे ती प्राण्यांना नाही तरीही आपण जनावरासारखे वागतो. या विचारांनी ही बुद्धी बदलायची आहे "असुषु रमते इति असुराः", खा, प्या, मजा करा ही असुरी वृत्ती. 'यावज्जिवेत

सुखं जीवेत्...' या चार्वाक वृत्तीने मनुष्य काम, क्रोध, लोभ यांच्या आहारी जाऊन पशुतुल्य जीवन जगत आहे. १५ टक्के सात्त्विक लोकांनी इतरांना वळवायचे आहे. रामाच्या वेळीसुद्धा रावण होता व कृष्णाच्या वेळीसुद्धा कंस, दुर्योधन होतेच. केवळ मी सज्जन आहे म्हणून चालत नाही. विश्वबंधुत्वाची व आत्मौपम्य दृष्टीने पाहण्याची दृष्टी गीता देते. आज माणूस दुसऱ्या माणसाकडे स्वार्थाने, संशयाने पाहतो आहे. कुटुंबात, समाजात, माणसा-माणसामध्ये भावसंबंध दुरावत चालले आहेत. माणसाने माणसावर प्रेम करणे हे उन्नत माणसाचे लक्षण आहे. हे सर्व बदलण्याची शक्ती भक्तीत आहे व याच भक्तीचा खरा अर्थ गीतेने सांगितला आहे.

या अध्यायाच्या सुरुवातीस अर्जुनाने गीतेतील आपला शेवटचा आणि अत्यंत मार्मिक प्रश्न भगवंतांना विचारला आहे -

**संन्यासस्य महाबाहो तत्त्व मिच्छामि वेदितुम् ।**
**त्यागस्य च हृषीकेश पृथक्वेशिनिषूदन ।।१।।**

"हे महाबाहो हृषीकेषा! हे केशिदैत्याचा वध करणाऱ्या भगवंता!! संन्यास व त्याग यांचे स्वतंत्रपणे यथार्थ स्वरूप जाणण्याची माझी इच्छा आहे. तरी मला ते स्पष्ट करून सांगावे." ।।१।।

मागील अध्यायात भगवंत म्हणाले होते की, मोक्षपरायण जीवनासाठी संन्यास आणि कर्मयोग अशा दोन प्रकारच्या निष्ठा म्हणजे साधन-प्रणाली प्रचलित असल्या, तरी त्या दोहोंना मूलतः एकच मानले पाहिजे. कारण दोन्हीचा उद्देश मोक्षप्राप्ती हाच आहे. आणि मोक्ष प्राप्त करण्यासाठी दोहोंतही मनाच्या सर्व संकल्पांचा म्हणजेच कामनांचा त्याग करावा लागतो. (गीता ३.३, ५.५ आणि ६.२). पण त्याचबरोबर भगवंतांनी असेही सांगितले की, या दोहोंमधील तुलनात्मकदृष्ट्या कर्मयोग हा वैशिष्ट्यपूर्ण आहे. कारण, प्रपंचात राहूनही सर्व प्रापंचिक कर्तव्ये पार पाडताना कर्मयोगाचे सहजपणे आचरण करता येते (गीता ५.२). कर्मफलावर आपला अधिकार न मानता म्हणजे फलाच्या लोभाने कर्म न करता, अनासक्त राहून केवळ कर्तव्य भावनेने कर्म करणे यालाच भगवंतांनी 'कर्मयोग' म्हटले आहे. (गीता २.४७). भगवंतांनी स्पष्टपणे म्हटले आहे की, अनासक्त राहून सदैव आपल्या कर्तव्यकर्माचे चांगल्या प्रकारे पालन केले पाहिजे. (गीता ३.१९) बाराव्या अध्यायात भक्तियोगाविषयी सांगतानाही भगवंतांनी कर्मफलत्यागाला ज्ञान आणि ध्यान यांच्यापेक्षाही श्रेष्ठ मानले आहे, कारण कर्मफलाच्या त्यागाने तत्काळ शांती लाभते. (गीता १२.१२)



आपल्या या शेवटच्या प्रश्नात अर्जुन संन्यासाचा खरा अर्थ काय आहे आणि त्यागाचा खरा अर्थ काय आहे, तसेच या दोहोंत कोणते अंतर आहे, हे स्पष्टपणे जाणू इच्छितो.

श्री भगवान म्हणतात -

**काम्यानां कर्मणां न्यासं संन्यासं कवयो विदुः ।**
**सर्वकर्मफलत्यागं प्राहुस्त्यागं विचक्षणाः ।।२।।**
**त्याज्यं दोषवदित्येके कर्म प्राहुर्मनीषिणः ।**
**यज्ञदानतपः कर्म न त्याज्य मिति चापरे ।।३।।**
**निश्चयं शृणु मे तत्र त्यागे भरतसत्तम ।**
**त्यागो हि पुरुषव्याघ्र त्रिविधः संप्रकीर्तितः ।।४।।**
**यज्ञदानतपः कर्म न त्याज्यं कार्यमेव तत् ।**
**यज्ञो दानं तपश्चैव पावनानि मनीषिणाम् ।।५।।**
**एतान्यपि तु कर्माणि संगं त्यक्त्वा फलानि च ।**
**कर्तव्यानीति मे पार्थ निश्चितं मतमुत्तमम् ।।६।।**
**नियतस्य तु संन्यासः कर्मणो नोपपद्यते ।**
**मोहात्तस्य परित्यागस्तामसः परिकीर्तितः ।।७।।**
**दुःखमित्येव यत्कर्म कायक्लेशभयात्त्यजेत् ।**
**स कृत्वा राजसं त्यागं नैव त्यागफलं लभेत् ।।८।।**
**कार्यमित्येव यत्कर्म नियतं क्रियतेऽर्जुन ।**
**संगं त्यक्त्वा फलं चैव स त्यागः सात्त्विको मतः ।।९।।**
**न द्वेष्ट्यकुशलं कर्म कुशले नानुषज्जते ।**
**त्यागी सत्त्वसमाविष्टो मेधावी छिन्नसंशयः ।।१०।।**

"काम्य कर्मे (म्हणजे फळाच्या आशेने करावयाची कर्मे) न करणे याला काही विद्वान संन्यास म्हणतात. तर काही पंडित सर्व कर्मांच्या फळांचा त्याग करणे याला त्याग असे म्हणतात." ।।२।।

"काही विद्वान कर्मच दोषयुक्त म्हणजे बंधनकारक आहे म्हणून ते सर्वस्वी टाकावे असे म्हणतात, तर दुसरे काही यज्ञ, दान, तप ही कर्मे टाकू नयेत असे म्हणतात." ।।३।।

"तरी हे भरतश्रेष्ठा! त्यागाविषयीचे माझे निश्चित मत ऐक. हे पुरुषश्रेष्ठा! त्याग तीन प्रकारचा आहे." ।।४।।

"यज्ञ, दान, तप या तीन कर्मांचा त्याग करणे योग्य नव्हे. उलट ती अवश्य केली पाहिजेत. कारण यज्ञ, दान आणि तप यांचे आचरण बुद्धिमंतांना पवित्र करते." ।।५।।

"ही कर्मेसुद्धा आसक्ती सोडून फळाची इच्छा न करता केली पाहिजेत. हे पार्था! हे माझे निश्चित केलेले असे उत्तम मत आहे." ।।६।।

"जे कर्म (स्वधर्माप्रमाणे) नियत म्हणजे करणे आवश्यक असे नेमलेले आहे, अशा कर्मांचा त्याग करणे योग्य नाही. अज्ञानाने किंवा आळसाने त्यांचा त्याग करणे याला 'तामस' त्याग म्हणतात." ।।७।।

"शारीरिक कष्टांच्या भीतीने दुःखदायक म्हणून जो कर्तव्यकर्मे टाळतो, त्याचा तो त्याग 'राजस' होय. अशा त्यागाने कर्मत्यागाचे फळ मिळत नाही." ।।८।।

"हे अर्जुना! शास्त्राने आणि व्यवहाराने नेमून दिलेले काम आसक्ती व फळाचा त्याग करून, जेव्हा कर्तव्य म्हणूनच केले जाते, ते त्याला 'सात्त्विक' त्याग म्हणतात." ।।९।।

"मनात कोणतीही शंका नसलेला, सत्त्वशील, बुद्धिमान, खरा त्यागी अशा मनुष्याला जर (कर्तव्य म्हणून) अकल्याणकारक कामही करावे लागले तरी त्याचा तो द्वेष करीत नाही आणि कल्याणकारक कामे करताना त्यात मनाने गुंतत नाही." ।।१०।।

मीमांसा-तत्त्वज्ञानानुसार वेदांनी सांगितलेली कर्मे तीन प्रकारची आहेत - (१) 'प्रतिषिद्ध' म्हणजे निषिद्ध: अनर्थाला कारण होत असल्यामुळे ते कुणीही करू नये. (२) 'काम्य' म्हणजे कोणत्यातरी विशिष्ट कामनेच्या सिद्धीसाठी जे केले जाते, (३) 'नित्यनैमित्तिक'. 'नित्य' म्हणजे संध्यावंदन इ. कर्मे आणि 'नैमित्तिक' म्हणजे विशिष्ट काळी करायची श्राद्धादी कर्मे. ही कर्मे कर्तव्य म्हणून केली जातात.

भगवंत म्हणतात की, काही विद्वान काम्य कर्मांच्या त्यागाला संन्यास असे म्हणतात. कारण, कामना असल्यामुळे असे कर्म मोक्ष देऊ शकत नाही. पण काही अन्य विचक्षण विद्वान म्हणतात की, त्याग म्हणजे कर्माचा त्याग नव्हे तर सर्व कर्मांच्या फलाचा त्याग. कर्मफलाचा त्याग करून केलेले कर्तव्य-कर्म कर्मबंधनाचा हेतू होत नाही.

काही बुद्धिमान लोक म्हणतात की, सगळ्याच कर्मात काही ना काही दोष असतोच आणि म्हणून तो मोक्षाला अडथळा होय. म्हणून संन्याशाने सर्व प्रापंचिक कर्मांचाच त्याग केला पाहिजे. महाभारतातील शांतिपर्वात म्हटले आहे -

**कर्मणा बध्यते जन्तुर्विद्यया तु प्रमुच्यते ।**
**तस्मात् कर्म न कुर्वन्ति यतयः पारदर्शिन ।।**

(म.भा. २४०.७)



याचा अर्थ, "कर्माने प्राणी बांधला जातो आणि विद्येने (आत्मविद्येने) मुक्त होतो. म्हणून जे पारदर्शी यती (संन्यासी) आहेत, ते कर्म करीत नाहीत." पण काही विद्वानांच्या मते यज्ञ, दान, तप ही कर्मे त्याग करण्यायोग्य नाहीत.

आता भगवंत याविषयीचे आपले निश्चित मत सांगत आहेत. ते म्हणतात की, यज्ञ, दान आणि तप ही कर्मे तर माणसाला पवित्र करणारी आहेत. म्हणून ती करणे कर्तव्यच मानले पाहिजे. त्यांचा त्याग करता कामा नये; तर ही कर्मे आणि इतर सर्व कर्तव्य कर्मे अवश्य केली पाहिजेत. फक्त त्या कर्मांविषयी किंवा त्यांच्या फलाबद्दल आसक्ती ठेवता कामा नये. असे अनासक्त राहिल्यास कर्मे मोक्षाचा अडसर होत नाहीत. भगवंत म्हणतात की, हेच माझे ठाम असे उत्तम मत आहे.

या अध्यायाच्या ४ थ्या श्लोकात भगवंतांनी तीन प्रकारच्या त्यागाचा उल्लेख केला होता. आता ७, ८ व ९ व्या श्लोकात या तीन प्रकारच्या म्हणजे तामस, राजस व सात्त्विक त्यागाचे वर्णन केले आहे. स्वतःची नियत कर्मे सोडून जे केवळ हरिनाम घेतात, अशा महाभागांसाठी हा श्लोक उत्तम मार्गदर्शन करणारा आहे. तुझ्यावर येऊन पडलेले कर्म तू मोहाने सोडलेस, तर तुझा त्याग हा तामस आहे. असे कर्म सोडणे हे योग्य नाही, असे भगवंतांनी स्पष्ट शब्दांत फटकारले आहे -

**अपहाय निज कर्म कृष्ण कृष्णेति वादिनः ते हरेर्द्वेषिणः पापाः ...।**

(भागवत)

"स्वतःचे कर्म सोडून केवळ कृष्ण-कृष्ण म्हणणारे हरिभक्त हे एकाप्रकारे हरीचा द्वेष करून पाप ग्रहण करतात." वस्तुतः कर्म सोडून देणे हा त्याग नव्हे. कर्मे करीत असताना अंतःकरणातील कामना-आसक्ती-ममता यांचा त्याग करणे हाच खरा त्याग म्हटला पाहिजे. याच त्यागामुळे मनुष्याची कर्मबंधनातून सुटका होते.

शारीरिक कष्टांच्या भीतीने जी कर्मे टाकून दिली जातात, तो राजस त्याग होय. नियत कर्तव्यकर्मांत अशा राजस व्यक्तींना केवळ दुःखच दिसते. याचे कारण त्यांचे शास्त्रसम्मत पाप-पुण्य, जन्म-मरण, विहित-अविहित, कर्मफल यांवर श्रद्धा नसते. त्यामुळे शास्त्रमर्यादा व लोकमर्यादा यांचे पालन करण्यात जे कष्ट करावे लागतात, त्याचा त्याला उबग येतो. सुखासीन होऊन अल्प कष्टात जगण्यात ते धन्यता मानतात. पण अशा त्यागाने त्यागाचे फल म्हणजे शांती, सुख किंवा कर्मबंधनातून सुटका त्यांना लाभत नाही.

दहाव्या श्लोकात भगवंतांनी एक विशेष गोष्ट सांगितली आहे. जो सत्त्वगुणाने संपन्न, संशयरहित, बुद्धिमान आणि खरा त्यागी आहे, तो अकुशल कर्माचाही द्वेष करत नाही आणि कुशल कर्माविषयीही आसक्ती बाळगत नाही. कोणतेही कर्म, ते कुशल असो वा अकुशल, जे त्याचे कर्तव्य बनते, त्याला तो मनापासून आणि चांगल्या प्रकारे पूर्ण करतो. कुरुक्षेत्र-युद्धात प्रचंड हिंसा होईल, परंतु समाजात धर्माच्या प्रतिष्ठेच्या दृष्टीने ती आवश्यक कर्तव्य असल्याने भगवंतांनी अर्जुनाला युद्धाला प्रेरित केले. महाभारतात धर्मव्याधाचा प्रसंग आला आहे. आपल्या पिढ्यान्‌पिढ्यांपासून चालत आलेले मांस विक्रीचे काम तो करीत असून, त्यात त्याची कोणतीही आसक्ती किंवा द्वेषही नव्हता. एक सामाजिक कर्तव्य म्हणून तो ते काम मनापासून करीत होता. मातृपितृभक्त या धर्मव्याधाची महाभारतात फार प्रशंसा केली आहे. या श्लोकात भगवंतांनी अशा लोकांना 'खरा त्यागी' असे म्हटले आहे.

९ व्या श्लोकात भगवंतांनी जीवनातील अंतिम कल्याणाचा मार्ग सांगितला आहे. ते म्हणतात, '' 'माझे कर्तव्य आहे' असे समजून जो मनुष्य नियत कर्म करीत असतो, पण ते कर्म आणि कर्मफल यांच्याविषयीची सर्व आसक्ती सोडून देतो, त्याचा तो त्याग 'सात्त्विक त्याग' आहे.'' असे कर्म बंधनकारक होत नाही.

गीता केवळ तत्त्वज्ञान सांगत नाही तर जीवनात हे तत्त्वज्ञान आचरणात कसे येईल, त्याचा मार्गही दाखविते. सर्वसामान्यांना आसक्ती व फलेच्छा सोडून काम करणे व्यवहारात कठीण आहे, मग हे टाकायचे कसे? म्हणून 'भगवंताच्या शक्तीने हे सर्व घडते, मी निमित्तमात्र आहे' अशा समर्पित भावनेने व प्रेमाने त्याचे फळ भगवंताला अर्पण करणे हीच भक्तीची खरी स्थिती, असे गीता सांगते. 'कामही प्रभूचे आणि त्याचे फळही प्रभूचे' अशा समर्पित वृत्तीने कर्म केले, तर संगत्याग व फळत्यागही घडतील. हाच खरा संन्यास आहे. 'सम्यक् न्यास = 'संन्यास'. 'न्यास' म्हणजे ठेवणे. 'सम्यक् न्यास' म्हणजे ईश्वरचरणी समर्पित करणे. ईश्वरार्पणबुद्धीने केलेले कर्म बंधनात पाडत नाही.

११ व्या श्लोकात भगवंतांनी त्यागी मनुष्याची व्याख्या केली आहे, तर १२ व्या श्लोकात कर्मबंधनाविषयी स्पष्टीकरण दिले आहे.

**न हि देहभृता शक्यं त्यक्तुं कर्माण्यशेषतः ।**
**यस्तु कर्मफलत्यागी स त्यागीत्यभिधीयते ।।११।।**
**अनिष्टमिष्टं मिश्रं च त्रिविधं कर्मणः फलम् ।**
**भवत्यत्यागिनां प्रेत्य न तु संन्यासिनां क्वचित् ।।१२।।**



''देहधारी माणसाला पूर्णपणे कर्मे टाळणे मुळीच शक्य नाही. म्हणून ज्याने (कर्मे न सोडता) फक्त कर्मफलांचा त्याग केला त्यालाच त्यागी म्हणजे संन्यासी म्हटले जाते.'' ।।११।।

''कर्माचे फळ तीन प्रकारचे असते. अशुभ, शुभ व संमिश्र. कर्मफळाची आशा असलेल्यांना ते मेल्यावर मिळते. परंतु संन्याशांना म्हणजे फलाशा नसलेल्यांना ते कधीही मिळत नाही. ते कर्मबंधनातून मोकळे होतात.'' ।।१२।।

देह असेतोपर्यंत कर्म अटळ असते. पण कर्मे करूनसुद्धा कर्मबंधनातून मुक्त राहण्याचा मार्ग गीतेने दाखविला आहे. सर्व कर्मे आसक्ती सोडून ईश्वरार्पणबुद्धीने जो करतो, त्याला कर्मविपाकातून होणारे पाप-पुण्यरूप कर्मफल लागत नाही. म्हणून ''जे काही करतोस, खातोस, हवन करतोस, दान करतोस, तप करतोस, ते सर्व मला अर्पण करून करत जा; म्हणजे त्यातून कोणतेही कर्मबंधन तुला लागणार नाही.'' असे भगवंत म्हणतात. (अ. ९-२७,२८). कर्मफल भगवंताला अर्पण करून अनासक्त भावाने कर्तव्य कर्म करणाराच खरा संन्याशी म्हणजे त्यागी असा अंतिम निर्वाळा भगवंतांनी दिला आहे.

६ व्या श्लोकामध्ये, यज्ञदानादी कर्मेसुद्धा आसक्ती न ठेवता फलांचा त्याग करून केली पाहिजेत, हे स्वतःचे म्हणून निश्चित मत सांगितले. कारण ही कर्मे चित्तशुद्धिकारक असल्यामुळे कर्मरूपी हे यज्ञचक्र लोकसंग्रहार्थ कायम ठेवले पाहिजे, असा स्पष्ट निर्वाळा भगवंतांनी दिला. भगवंतांनी कर्मयोगाचे सांगोपांग निरूपण या अध्यायात केले आहे. ''तू कर्म कर'' असाच उपदेश अर्जुनास केला आहे. चित्तशुद्धी करून परमेश्वरार्पणपूर्वक स्वधर्माप्रमाणे आणि कर्तव्य भावनेने, अखेरच्या क्षणापर्यंत कर्मे करीत राहणे हा कर्मयोगपर सिद्धान्तच जीवन कृतार्थ करील हे या सर्व उपदेशांचे सार आहे. गीतेची सर्व शिकवण पुनःपुन्हा हेच सांगते की, कर्माचा त्याग करू नका. कर्म सतत करायचे व फलाचा त्याग करायचा हाच गीतेचा आग्रह आहे.

कर्मयोगाच्या चढणीच्या मार्गावरील 'कर्मफलत्याग' ही केवळ पहिली पायरी आहे. कर्मयोगसिद्धीसाठी कर्मफलाविषयी अनासक्ती ही तर हवीच; पण त्याबरोबर कर्माविषयीही अनासक्त असले पाहिजे. कर्माचा धनी, यज्ञाचा भोक्ता जो ईश्वर तोच कर्माचा कर्ता आहे ही गोष्ट ध्यानात घेऊन कर्मफलाप्रमाणे कर्मही भगवंताला अर्पण केले पाहिजे. ईश्वरच कर्ता, भोक्ता, भर्ता, महेश्वर आहे अशा भावनेने सर्व कर्म यज्ञबुद्धीने समर्पण केले पाहिजे. 'मी कर्ता

आहे' हे विसरून 'ईश्वरच एक कर्ता' आहे या भावनेने आपली संकल्पशक्ती ईश्वराला समर्पित करायची. एवढेच नाही तर त्या ईश्वराच्या सनातन संकल्पाशी आपला संकल्प एकरूप करायचा तरच आपल्यातील अहंवृत्तीचे दमन होईल. कारण अहंच्या वासनेने आणि संकल्पाने स्पर्श झालेले कोणतेही कर्म निर्दोष होऊ शकत नाही. कर्मत्याग करण्यापेक्षा अशा शरणागत बुद्धीने केलेले कर्म हेच ईश्वराप्रत नेणारा श्रेयस्कर मार्ग आहे.

हा कर्मयोग विशद करण्यासाठी, भगवंतांनी अठराव्या अध्यायात त्याची सविस्तर मांडणी केली आहे. कर्मयोग व संन्यास यांच्याबद्दलचे विचार निरनिराळ्या अध्यायांतून जे मांडले होते (अ. ३-३, ५-२ ते १०, २-३९) त्यांचाच उपसंहार पुढील श्लोकांतून भगवंतांनी केला आहे. सांख्यनिष्ठा व योगनिष्ठा यांची अलग अलग तत्त्वे जाणण्यासाठी इच्छा अर्जुनाच्या मनामध्ये होतीच. त्यासाठी भगवंतांनी पुन्हा एकदा सांख्य-सिद्धान्त अर्जुनाला ऐकवला.

श्री भगवान म्हणाले,

**पंचैतानि महाबाहो कारणानि निबोध मे ।**
**सांख्ये कृतान्ते प्रोक्तानि सिद्धये सर्वकर्मणाम् ।।१३।।**
**अधिष्ठानं तथा कर्ता करणं च पृथग्विधम् ।**
**विविधाश्च पृथक् चेष्टा दैवं चैवात्र पंचमम् ।।१४।।**
**शरीरवाङ्मनोभिर्यत्कर्म प्रारभते नरः ।**
**न्याय्यं वा विपरीतं वा पंचैते तस्य हेतवः ।।१५।।**
**तत्रैवं सति कर्तारमात्मानं केवलं तु यः ।**
**पश्यत्यकृतबुद्धित्वान्न स पश्यति दुर्मतिः ।।१६।।**
**यस्य नाहंकृतो भावो बुद्धिर्यस्य न लिप्यते ।**
**हत्वापि स इमाँल्लोकान्न हन्ति न निबध्यते ।।१७।।**
**ज्ञानं ज्ञेयं परिज्ञाता त्रिविधा कर्मचोदना ।**
**करणं कर्म कर्तेति त्रिविधः कर्मसंग्रहः ।।१८।।**
**ज्ञानं कर्म च कर्ता च त्रिधैव गुणभेदतः ।**
**प्रोच्यते गुणसंख्याने यथावच्छृणु तान्यपि ।।१९।।**

"हे पराक्रमी अर्जुना! सर्व कर्मे घडून येण्यास सांख्यांच्या सिद्धान्तात जी पाच कारणे सांगितली आहेत, ती माझ्याकडून समजून घे." ।।१३।।

"जागा, कर्ता, निरनिराळी साधने, कर्त्याच्या निरनिराळ्या हालचाली आणि पाचवे दैव म्हणजे अज्ञात शक्ती होय." ।।१४।।

"शरीराने, वाचेने किंवा मनाने मनुष्य जे जे कर्म आरंभितो मग ते न्याय्य असो वा विपरीत म्हणजे अन्याय्य असो त्यांची ही पाच कारणे आहेत." ।।१५।।



"असे असतानाही फक्त शुद्ध आत्माच (किंवा आपणच) कर्ता आहे असे जो अशुद्ध बुद्धीमुळे समजतो, त्या अज्ञानी माणसाला खरे काय ते कळत नाही." ।।१६।।

"ज्याला 'मी करतो' ही भावना नाही, ज्याची बुद्धी अलिप्त आहे, त्याने या सर्व लोकांना ठार मारले तरी तो मारणारा ठरत नाही आणि त्याचे पाप त्याला लागत नाही." ।।१७।।

"ज्ञान, ज्ञेय आणि ज्ञाता हे तीन घटक कर्माला प्रेरणा देणारे आहेत. करण, कर्म व कर्ता हे तीन घटक कर्म घडविणारे आहेत." ।।१८।।

"ज्ञान, कर्म आणि कर्ता प्रत्येकी तीन गुणांच्या भेदामुळे तीन तीन प्रकारचे आहेत, असे सांख्यशास्त्रात सांगितले आहे. ते प्रकार जसेच्या तसे तुला सांगतो. ऐक." ।।१९।।

श्लोक १३ ते १५, यांमध्ये भगवंतांनी अर्जुनाला सांख्य हा विषय ऐकण्यास सांगून, सांख्य सिद्धान्ताप्रमाणे कर्माच्या सिद्धीमध्ये अधिष्ठानादी पाच हेतूंचे वर्णन केलेले आहे. १६ व्या श्लोकामध्ये शुद्ध असलेल्या आत्म्याला कर्ता असे समजणाऱ्यांची निंदा करून, १७ व्या श्लोकामध्ये कर्तेपणाचा अभिमान सोडून कर्म करणाऱ्यांची प्रशंसा केली आहे. अठराव्या श्लोकात कर्म-प्रेरणा आणि कर्मसंग्रह यांचे स्वरूप सांगून १९ व्या श्लोकामध्ये, गुणभेदामुळे होणाऱ्या ज्ञान, कर्म व कर्ता यांचे त्रिविध भेद सांगण्याची प्रस्तावना केली आहे.

सांख्य याचा अर्थ ज्ञान असा आहे. "सम्यक् ख्यायते ज्ञायते परमात्माऽनेनेति सांख्यतत्त्वज्ञानम्" म्हणून ज्या शास्त्रामध्ये तत्त्वज्ञानाच्या साधनरूपी ज्ञानयोगाचे प्रतिपादन केले असेल, त्याला सांख्य म्हणतात. संपूर्ण कर्माच्या सिद्धीसाठी जे पाच हेतू सांख्य सिद्धान्तामध्ये सांगितले आहेत, ते तू माझ्याकडून नीटपणे समजून घे असे भगवंतांनी अर्जुनाला सांगितले. अधिष्ठान, कर्ता, निरनिराळ्या प्रकारची करणे, अनेक प्रकारच्या वेगवेगळ्या क्रिया आणि तसेच पाचवे कारण दैव आहे. 'अधिष्ठानम्' हे पद येथे मुख्यतः करण व क्रिया यांचे आधाररूप असलेल्या शरीराचे वाचक आहे. याचा दुसरा अर्थ 'जागा' असाही आहे. 'कर्ता' म्हणजे त्याच्या आत असलेला 'मी', 'प्रकृतिस्थ पुरुष', 'भोक्ता', अथवा 'जीवात्मा'. सर्व कर्मे प्रकृतीच्या गुणांमुळे होत असतात, पण केवळ अहंकार व अज्ञान यांमुळे अविवेकी पुरुष स्वतःला 'कर्ता' असे समजतो. असा कर्ता कर्मसिद्धीमध्ये हेतू बनतो. कर्मसिद्धीसाठी तिसरे कारण 'करण'. एकूण तेरा 'करणे' आहेत - पाच कर्मेंद्रिये व पाच ज्ञानेंद्रिये ही दहा 'बहिःकरणे' म्हणजे बाहेरची

करणे व मन, बुद्धी, अहंकार ही तीन 'अंतःकरणे' म्हणजे आतील करणे आहेत. ह्या तेरा करणांच्या अनेकविध हालचालरूपी 'क्रिया' आहेत. अशा नाना प्रकारच्या भिन्न भिन्न क्रिया हे कर्मसिद्धीचे चौथे कारण व पाचवे कारण म्हणजे 'दैव'. गीताकारांनी 'दैवा'ला पाचवे स्थान दिले आहे. 'उद्धरेदात्मनात्मानं...' (गीता ६.५) प्रत्येकाने स्वतःचा उद्धार स्वतः करावा. आपणच आपल्या उन्नतीला व अधोगतीला कारण असतो. आपणच आपले मित्र असतो व आपणच आपले शत्रू असतो. असा तेजस्वी पुरुषार्थ सांगणाऱ्या भगवंतांनी येथे दैवाला पाचवे स्थान दिले आहे. 'दैव' याचे वेगवेगळे अर्थ केले गेले आहेत. पूर्वी केलेल्या शुभाशुभ कर्मांच्या संस्कारांचे वाचक म्हणून 'दैव' शब्द आहे. मनुष्याचे जसे कर्म असते तसा संस्कार अंतःकरणात होतो. शुभ कर्माचे शुभ संस्कार व अशुभ कर्माचे अशुभ संस्कार! या संस्काराप्रमाणेच कर्मप्रेरणा मिळते व बरी-वाईट फळे प्राप्त होतात. दैव म्हणजे 'प्रारब्ध' हा एक अर्थ आहे. बरेच जण याला 'अदृष्ट' असेही म्हणतात.

१५ व्या श्लोकात भगवंत म्हणतात की, मनुष्य शरीर, वाणी, अंतःकरण यांनी जी जी कर्मे करतो, मग ती शास्त्रविहित असोत अथवा शास्त्रविरुद्ध असोत, ती सर्व या वरील सांख्य सिद्धान्ताच्या पाच कारणांमुळे घडतात.

वास्तविक आत्मा हा केवल, शुद्ध, निर्विकार, अकर्ता असताना त्यालाच जे कर्ता मानतात, अशा मलिन बुद्धी असणाऱ्या अज्ञानी माणसांची भगवंतांनी १६ व्या श्लोकात निंदा केली आहे. सर्व कर्मे घडण्यामध्ये अधिष्ठानादी पाच कारणे असतात. आत्म्याचा त्या कर्मांशी काहीही संबंध नाही. तरीसुद्धा अविद्येमुळे त्याला कर्ता समजले जाते. आत्मा हा नित्य, शुद्ध, बुद्ध, निर्विकार, असंग असा आहे. हे आत्म्याचे यथार्थ स्वरूप जाणून त्याला 'अकर्ता' म्हणणाऱ्या मनुष्यांची स्तुती १७ व्या श्लोकात भगवंतांनी केली आहे. अशा मनुष्याची बुद्धी सांसारिक पदार्थात किंवा कर्मात लिप्त होत नाही. ममता, आसक्ती व कामना यांचा सर्वस्वी त्याग करून, देहात्मकता टाकून देऊन त्यांनी आपला अहंभाव पूर्णपणे नष्ट केलेला असतो. त्यामुळे अशी माणसे कर्मबंधनातून मुक्त होतात. त्यामुळे त्यांच्याकडून होणाऱ्या कर्माशी किंवा त्याच्या फळाशी त्यांचा संबंध राहात नाही. अशी कर्मे त्यांच्याकडून केवळ लोकसंग्रहार्थ केली जातात. त्यामुळे यज्ञ, दान, तपादी शुभ कर्मे करूनसुद्धा त्यात ते लिप्त होत नाहीत व फलाने बद्ध होत नाहीत. युद्धात क्षात्रधर्मानुसार, कर्तव्यभावनेने त्यांनी लोकांची हत्या जरी केली तरी त्या पापांनी तो बद्ध होत नाही. कर्तव्यभावनेने केलेले कर्म अशा अनासक्त माणसाला बंधनात पाडत नाही. तो ते कर्म करूनसुद्धा अकर्मीच राहतो. जणू त्याच्या हातून ते अशुभ कर्म घडलेच नाही.



आत्म्याच्या अकर्तेपणाला अनुसरून, कर्माचे यथार्थ स्वरूप चांगल्या प्रकारे समजावून देण्यासाठी भगवंत आता १८ व्या श्लोकात 'कर्मचोदना' व 'कर्मसंग्रह' याचे प्रतिपादन करीत आहेत. ज्ञान, ज्ञेय व ज्ञाता अशी तीन प्रकारची 'कर्मचोदना' आणि करण, कर्म व कर्ता असा तीन प्रकारचा 'कर्मसंग्रह' आहे. 'कर्मचोदना' म्हणजे कर्म करण्याची प्रेरणा. ती ज्ञान, ज्ञेय व ज्ञाता याप्रमाणे तीन प्रकारची असते. उदाहरणार्थ, प्रत्यक्ष मडके करण्यापूर्वी मला अमुक करावयाचे (ज्ञेय) व ते अमक्या रीतीने होईल (ज्ञान) असे कुंभार (ज्ञाता) आपल्या मनाने ठरवीत असतो. ही 'कर्मचोदना' झाली. मनाचा याप्रमाणे निश्चय झाल्यावर तो कुंभार (कर्ता), चाक वगैरे साधने (करण) मिळवून प्रत्यक्ष मडके (कर्म) तयार करतो, हा 'कर्मसंग्रह' झाला.

अशा प्रकारे कर्मप्रेरणा व कर्मसंग्रह यांचे स्वरूप साररूपाने सांगून, यांपैकी सांख्ययोगाच्या सिद्धांतानुसार, ज्ञान, कर्म व कर्ता, ही सत्त्व, रज, तम या गुणभेदांमुळे, कशी तीन-तीन प्रकारची आहेत, याचे सविस्तर वर्णन भगवंत आता करीत आहे.

पुढील श्लोकात भगवंतांनी ज्ञानाचे त्रिविध भेद सांगितले आहेत -

**सर्वभूतेषु येनैकं भावमव्ययमीक्षते ।**
**अविभक्तं विभक्तेषु तज्ज्ञानं विद्धि सात्त्विकम् ।।२०।।**
**पृथक्त्वेन तु यज्ज्ञानं नानाभावान्पृथग्विधान् ।**
**वेत्ति सर्वेषु भूतेषु तज्ज्ञानं विद्धि राजसम् ।।२१।।**
**यत्तु कृत्स्नवदेकस्मिन् कार्ये सक्तमहैतुकम् ।**
**अतत्त्वार्थवदल्पं च तत्तामसमुदाहृतम् ।।२२।।**

"निरनिराळया सर्व भूतांत एकच अविभक्त अविनाशी परमात्मतत्त्व भरून राहिले आहे, असे ज्या ज्ञानाने समजते, ते सात्त्विक ज्ञान समज." ।।२०।।

"सर्व भूतांमध्ये वेगवेगळया प्रकारचे नाना भाव आहेत, असे सर्वांत वेगळेपणा पाहणारे ज्ञान राजस ज्ञान समज." ।।२१।।

"परंतु कार्यरूप या शरीरालाच सर्वस्व समजून त्यातच निष्कारण व तत्त्वार्थ न जाणता गुंतून राहिलेले जे अल्पज्ञान ते तामस म्हटले आहे." ।।२२।।

निरनिराळ्या ज्ञानाची ही लक्षणे फार व्यापक आहेत. 'विभक्तात अविभक्त' किंवा 'नानात्वात एकत्व' ओळखणे हे खरे ज्ञानाचे लक्षण आहे. 'सर्वांभूती परमेश्वर' हे सात्त्विक ज्ञान अंगी बाणले की, दैवी संपत्तीच्या छटा सर्व कृतींतून उमटायला लागतात. "जे जे भेटे भूत । ते ते मानिजे भगवंत ।।" - अशी

अवस्था त्याची होऊन जाते. संत एकनाथांना तृषार्त गाढवामध्येसुद्धा भगवंताचे दर्शन झाले, म्हणून गंगेहून आणलेली कावड त्यांनी गाढवाला पाजली. एकच चैतन्य, अविनाशी आत्मतत्त्व सर्व प्राणिमात्रांत अनुभवणे याला सात्त्विक ज्ञान म्हणतात. संत श्री ज्ञानेश्वरांनी ही अनुभूती घेतली म्हणून विश्वात्मक देवाकडे त्यांनी सर्व मानवजातीच्या कल्याणाची प्रार्थना केली व पसायदान मागितले. लहानशा मुंगीपासून ब्रह्मापर्यंत, संपूर्ण ब्रह्मांडामध्ये, सर्व भूतमात्रांत एकाच आत्मतत्त्वाचा अनुभव घेणे हे सात्त्विक ज्ञान होय. पण जो मनुष्य प्राणिमात्रांच्या शरीर-रचना व स्वभावानुसार त्यांतील आत्म्याचेही भिन्नत्व अनुभवतो, ज्याला असे वाटते की, वेगवेगळ्या प्राण्यांमध्ये आत्मेसुद्धा भिन्न भिन्न आहेत त्याचे ज्ञान राजस ज्ञान होय. हे जणू भिन्न भिन्न घटांमध्ये एकच आकाशतत्त्व असूनही प्रत्येकात ते वेगवेगळे आहे असे समजणे! "नेह नानास्ति किंचन" म्हणजे या जगात नानात्व नाहीच, हे ज्याने ओळखले तो मुक्त; आणि "मृत्योः स मृत्युं गच्छति य इह नानेव पश्यति" म्हणजे जो या जगात नानात्व पाहतो, तो जन्ममरणाच्या फेऱ्यात पडतो असे कठोपनिषदात वर्णन केले आहे. (कठ. २.१.११). तामस ज्ञान हे ज्ञान नसून अज्ञानच आहे. कारण ते पूर्णपणे विपरीत असते. असा मनुष्य प्रकृतीचे कार्यरूप असलेल्या शरीरालाच आपले सर्वस्व मानतो. शरीरच सर्वस्व आहे असे मानून आत्यंतिक देहात्मकतेमध्येच तो जगतो. जड शरीर व चेतन आत्मा यांतील भेदच तो जाणत नाही. म्हणून हे ज्ञान अहैतुक व तत्त्वज्ञानरहित असल्यामुळे तुच्छ व त्याज्य आहे.

सत्त्व, रज, तम या गुणभेदांमुळे ज्ञान, कर्म, कर्ता, बुद्धी, धृती, सुख या सर्वांचे, सांख्ययोगाच्या सिद्धान्तानुसार तीन-तीन प्रकार होतात. २० व्या श्लोकापासून ३९ व्या श्लोकापर्यंत या गुणभेदांचे वर्णन भगवंतांनी केले आहे. यातील ज्ञानाचे तीन भेद आपण पाहिले. आता कर्म व कर्ता यांचे भेद पुढील श्लोकांतून भगवंत करीत आहेत -

**नियतं संगरहितमरागद्वेषतः कृतम् ।**
**अफलप्रेप्सुना कर्म यत्तत्सात्त्विकमुच्यते ।।२३।।**
**यत्तु कामेप्सुना कर्म साहंकारेण वा पुनः ।**
**क्रियते बहुलायासं तद्राजसमुदाहृतम् ।।२४।।**
**अनुबंधं क्षयं हिंसामनवेक्ष्य च पौरुषम् ।**
**मोहादारभ्यते कर्म यत्तत्तामसमुच्यते ।।२५।।**
**मुक्तसंगोऽनहंवादी धृत्युत्साहसमन्वितः ।**
**सिद्ध्यसिद्ध्योर्निर्विकारः कर्ता सात्त्विक उच्यते ।।२६।।**



**रागी कर्मफलप्रेप्सुर्लुब्धो हिंसात्मकोऽशुचिः ।**
**हर्षशोकान्वितः कर्ता राजसः परिकीर्तितः ।।२७।।**
**अयुक्तः प्राकृतः स्तब्धः शठो नैष्कृतिकोऽलसः ।**
**विषादी दीर्घसूत्री च कर्ता तामस उच्यते ।।२८।।**

"फलप्राप्तीची इच्छा न धरणारा पुरुष, प्रीती किंवा द्वेष न ठेवता, आसक्ती सोडून, स्वधर्माप्रमाणे वाट्यास आलेले, नेमलेले जे कर्म करतो ते सात्त्विक म्हटले आहे." ।।२३।।

"परंतु जे कर्म 'मी कर्ता' हा अहंभाव ठेवून फळाच्या इच्छेने मोठ्या परिश्रमाने केले जाते, ते राजस कर्म म्हटले आहे." ।।२४।।

"जे कर्म परिणाम, हानी, हिंसा आणि आपले सामर्थ्य यांपैकी कशाचाही विचार न करता केवळ अज्ञानाने सुरू केले जाते, त्याला तामस कर्म म्हणतात." ।।२५।।

"कर्माला किंवा कर्मफळाला न चिकटणारा, 'मी कर्ता' असा अहंभाव न ठेवणारा, धैर्यवान, उत्साही, यश आले तरी आनंदात वाहून न जाणारा व अपयश आले तरी खिन्न न होणारा तो सात्त्विक कर्ता समजावा." ।।२६।।

"विषयांवर प्रेम करणारा, फळप्राप्तीची इच्छा धरणारा, लोभी, इतरांना पीडा देणारा, अशुद्ध आचरण असलेला, यशाने हुरळून जाणारा व अपयशाने दुःखी होणारा कर्ता राजस होय." ।।२७।।

"चंचल स्वभावाचा, अडाणी, ताठलेला, ठक, दुसऱ्यांचे नुकसान करणारा, आळशी, सदा खट्टू आणि कामाचा उरक नसलेला कर्ता तामस म्हटला जातो." ।।२८।।

२३ व्या श्लोकात सात्त्विक कर्माची लक्षणे सांगितली आहेत. वर्ण, आश्रम, प्रकृती व परिस्थिती यांना अनुसरून शास्त्रविहित असे जे कर्म ज्याच्या वाट्याला आले आहे, ते त्याचे नियत कर्म होय. काम्य कर्मे किंवा निषिद्ध कर्मे सात्त्विक असू शकत नाहीत. कर्तेपणाचा अभिमान सोडून दिला पाहिजे. प्रकृतिधर्मानुसार कर्मे घडतच असतात. वृक्षामध्ये रूपांतर झाल्यानंतर जगाला त्याची फळे, सावली मिळत राहते. पानगळ सुरू झाल्यानंतर पुन्हा नवी पालवी येत असते. सृष्टिचक्र सतत सुरूच असते. मनुष्याचेसुद्धा तसेच आहे. 'अस्ति, जायते, वर्धते...' व शेवटी 'क्षीयते' हे जन्म-मृत्यूचे रहाटगाडगे चालूच राहते. प्रकृतिगुणांनुसार कर्मे घडत असतात. त्यामुळे कर्तृत्वाभिमानाला येथे स्थान नाही. सात्त्विक कर्मामध्ये कर्त्याची आसक्ती व द्वेष नसतो. असे कर्म केवळ लोकसंग्रहासाठी केले जाते. भविष्यकाळात त्या कर्मापासून कोणती फळे मिळतील याचा विचारही नसतो. असे

आसक्तिरहित निष्काम भावनेने केलेले कर्म सात्त्विक कर्मात मोडते. सत्त्वगुणामुळे व सात्त्विक कर्मामुळे ज्ञान उत्पन्न होते. म्हणून परमात्म्याचे तत्त्व जाणू इच्छिणाऱ्या मुमुक्षूंनी सात्त्विक कर्माचे आचरण केले पाहिजे. राजस-तामस कर्मामध्ये, मनुष्याचा अहंकार, कर्तृत्वाभिमान असल्यामुळे व सतत भोगांची इच्छा असल्यामुळे कर्त्याला कधी सुख तर कधी दुःख भोगावे लागते. आसक्ती व कामना यांनी प्रेरित होऊन, परिश्रमपूर्वक कामे होत असल्याने अशा कामाचा विस्तार, व्याप प्रचंड असतो. आज मी हे मिळविले, उद्या ते मिळवीन, माझ्यासारखा कोण आहे? मी हे करीन, मी ते करीन असा सतत देहाभिमान स्फुरत असतो. अशा राजस कर्माचे फळ केवळ दुःख आहे. रजोगुणी कर्मांमुळे मनुष्य बद्ध होतो. म्हणून भगवंत-प्राप्तीची इच्छा असणाऱ्या साधकांनी अशी कर्मे करू नयेत. राजसवृत्तीची माणसे थोडा तरी विचार करतील, पण तामस प्रवृत्तीची माणसे मूर्खतेमुळे, काहीही विचार न करता, विवेकशून्य होऊन, परिणामाची क्षिती न बाळगता, कार्याला आरंभ करतील. अशा कामामुळे किती जणांचे आपण नुकसान करतो, किती वेळ, शक्ती, धन फुकट जाईल, याचा तो साधक-बाधक विचार करत नाही. स्वतःच्या सामर्थ्याचा विचार न करता, दुःसाहस करून केलेल्या कामामुळे अपमान, निंदा, तिरस्कार हे आपल्या वाट्याला येईल, याचीही तो तमा बाळगत नाही. कारण मोह व अज्ञान यांमुळे तो बुद्धिभ्रष्ट झालेला असतो. तामस कर्माचे फळ केवळ अज्ञान असल्यामुळे मृत्यूनंतर त्याला अधोगती व ज्ञानरहित निम्न योनी प्राप्त होते. म्हणून आत्मकल्याणाची इच्छा धरणाऱ्या मनुष्यांनी असे कर्म चुकूनही करू नये.

२६ व्या श्लोकात आता सात्त्विक कर्त्याची लक्षणे भगवंत सांगत आहेत. आदर्श कार्यकर्त्याची लक्षणे साररूपाने या श्लोकात मांडली आहेत. हे एक परिपूर्ण, दैवीगुणसंपन्न पुरुषाच्या व्यक्तिमत्त्वाचे सुंदर वर्णन आहे. कोणत्याही क्षेत्रात कार्य करीत असताना अशा विलोभनीय कार्यकर्त्याची खरी गरज असते. अशा सात्त्विक कार्यकर्त्याला ऐहिक अथवा पारलौकिक भोगाबद्दल किंचितही ममता, आसक्ती, कामना, स्पृहा, वासना राहिलेली नसते. तो सर्वथा मुक्तसंग असतो. मन, बुद्धी, इंद्रिये, शरीर या अनात्म पदार्थांबद्दल आत्मबुद्धी नसल्यामुळे कोणत्याही कर्माचे कर्तृत्व व भोक्तृत्व तो अहंभावाने स्वीकारीत नाही. अभिमानशून्य होऊन तो कार्य करीत असतो. कर्तव्य-कर्मे करीत असताना कितीही विघ्ने आली तरी, न डगमगता, अविचल व निश्चयपूर्वक राहून अंगीकृत कार्य तडीला नेतो. श्रद्धेने व भावपूर्वक काम करीत असल्याने त्या कामात तो अखंड उत्साही असतो. असे कार्य करीत



असताना यश येवो अथवा अपयश, त्यांमध्ये तो समचित्त भावाने, निर्विकार होऊन ते स्वीकारतो. अंतःकरणात प्रसन्नता, खिन्नता अशा भावभावनांनी तो चंचल, विचल, विकारी होत नाही. या सहा गुणांनी युक्त असलेल्या कर्त्याला सात्त्विक कर्ता म्हटले आहे. राजस कर्ता कर्मफलाबद्दल आसक्त असतो. सर्व प्रकारच्या भोगांबद्दल त्याला ममता, आसक्ती असते. जे काही तो करतो ते केवळ स्वार्थपरायण होऊन भोग मिळविण्यासाठीच. नीती-अनीती, न्याय-अन्याय, श्रेय-प्रेय याचा विधिनिषेध न बाळगता तो केवळ धनसंग्रहाची लालसा धरतो. लोभ, सुख, भोग हे प्राप्त करीत असताना दुसऱ्याच्या सुखदुःखाची किंचितही पर्वा करीत नाही. आपला हव्यास पूर्ण करण्यासाठी, राग-द्वेषाने कर्म करीत असताना दुसऱ्यांच्या दुःखाला तो कारणीभूत होत असतो. ही एक प्रकारे तो हिंसाच करीत असतो. त्याच्या ठिकाणी कसलाही शुद्ध आचार, विचार राहत नाही. त्यामुळे त्याच्या शास्त्रनिषिद्ध कर्माला मलिनतेचा, अपवित्रतेचा स्पर्श होत असतो. अशा मनुष्याला कधी प्रसन्नता तर कधी खिन्नता प्राप्त होते. सुखदुःखाच्या लाटांवर आरूढ होऊन तो अशांत जीवन जगतो. अशा सर्व भावांनी युक्त असलेला कर्ता हा राजस कर्ता होय. तामस कर्त्याच्या अंगी निषिद्ध गुण वसत असतात. तमोगुणांनी मनुष्य मूढ होतो. कर्तव्य-अकर्तव्य याचे भान सुटल्यामुळे कोणत्याही कामात तो दक्ष, सावध राहत नाही. शास्त्र, सत्संग, स्वाध्याय यांपासून वंचित झाल्यामुळे, अज्ञानाने व अपरिपक्व संस्काराने युक्त होऊन तो काम करीत असतो. मन, वाणी व शरीर यांनी नम्र होऊन काहीही व्यवहार न करता, उद्धट, कठोर होऊन इतरांना तो तुच्छ समजत असतो. माता-पिता, गुरू-आचार्य व ज्येष्ठ-श्रेष्ठ व्यक्तींशी वागताना तो आढ्यतेने, गर्वाने वागतो. दुसऱ्यांचे अहित करण्यासाठी सतत त्याच्या मनात किल्मिषे येत असतात. ज्यांनी उपकार केलेत, त्यांच्या उपकारांची परतफेड तो अपकारांनी करतो. आळस, प्रमाद यांनी युक्त असल्यामुळे रात्रंदिवस स्वस्थ पडून राहणे हेच त्याचे काम होते. अशा माणसांच्या चिंता कधी संपत नाहीत. रात्रंदिवस शोक करून आजचे काम तो उद्यावर ढकलून केवळ वेळेचा अपव्यय करीत असतो. अशा या आठ लक्षणांनी युक्त असलेला कर्ता तामस म्हटला जातो. तामसी मनुष्याला अधोगती प्राप्त होते. मृत्यूनंतर पशु, पक्षी, कीटक... इ. नीच योनींमध्ये त्यांना गती मिळते. कल्याणाची इच्छा असणाऱ्या मनुष्याने अशा तामसी अवगुणांपासून दूर राहावे.

ज्ञान, कर्म व कर्ता यांचे सात्त्विक इ. तीन-तीन भेद क्रमाने सांगून, आता बुद्धी व धृती यांचे त्रिविध भेद पुढील श्लोकांतून भगवंत सांगत आहेत-

**बुद्धेर्भेदं धृतेश्चैव गुणतस्त्रिविधं शृणु ।**
**प्रोच्यमानमशेषेण पृथक्त्वेन धनंजय ।।२९।।**
**प्रवृत्तिं च निवृत्तिं च कार्याकार्ये भयाभये ।**
**बंधं मोक्षंच या वेत्ति बुद्धिः सा पार्थ सात्त्विकी ।।३०।।**
**यया धर्ममधर्मं च कार्यं चाकार्यमेव च ।**
**अयथावत्प्रजानाति बुद्धिः सा पार्थ राजसी ।।३१।।**
**अधर्मं धर्ममिति या मन्यते तमसावृता ।**
**सर्वार्थान् विपरीतांश्च बुद्धिः सा पार्थ तामसी ।।३२।।**
**धृत्या यया धारयते मनःप्राणेन्द्रियक्रियाः ।**
**योगेनाव्यभिचारिण्या धृतिः सा पार्थसात्त्विकी ।।३३।।**
**यया तु धर्मकामार्थान् धृत्या धारयतेऽर्जुन ।**
**प्रसङ्गेन फलाकांक्षी धृतिः सा पार्थ राजसी ।।३४।।**
**यया स्वप्नं भयं शोकं विषादं मदमेव च ।**
**न विमुञ्चति दुर्मेधा धृतिः सा पार्थ तामसी ।।३५।।**

"धनंजया! बुद्धी आणि धृती यांचेही गुणांमुळे तीन तीन भेद होतात. ते सर्व मी तुला वेगवेगळे सांगतो. ऐक." ।।२९।।

"हे पार्था! प्रवृत्ती आणि निवृत्ती, कर्तव्य आणि अकर्तव्य, कशास भ्यावे व कशास भिऊ नये, बंधन आणि मोक्ष हे सर्व जी बुद्धी जाणते ती सात्त्विक बुद्धी होय." ।।३०।।

"हे अर्जुना! ज्या बुद्धीच्या योगाने माणसाला धर्म, अधर्म, कर्तव्य, अकर्तव्य बरोबर समजत नाही, ती बुद्धी राजसी होय." ।।३१।।

"तमोगुणाने व्याप्त झाल्यामुळे जी अधर्माला धर्म असे मानते, तसेच सर्व बाबतीत जी शास्त्रविरुद्ध निर्णय करते, ती तामसी बुद्धी होय." ।।३२।।

"धृती म्हणजे दृढता, निश्चय. अजिबात न ढळणाऱ्या ज्या धृतीने मन, प्राण व इंद्रिये यांचे व्यापार कर्मफलत्यागरूप योगाने चालविले जातात, ती धृती, हे पार्था! सात्त्विक होय." ।।३३।।

"हे अर्जुना! ज्या धृतीने मनुष्य धर्म, अर्थ व काम या पुरुषार्थांचे अवलंबन करतो आणि त्या त्या प्रसंगानुसार त्यांच्या फळाचीही इच्छा करतो, ती राजसी धृती होय." ।।३४।।

"हे पार्था! ज्या धृतीमुळे मंदबुद्धीचा मनुष्य झोप, भय, शोक, दुःख आणि उन्मत्तपणा मुळीच टाकत नाही, ती तामसी धृती होय." ।।३५।।

प्रथम सात्त्विक बुद्धी, मग राजस बुद्धी व शेवटी तामस बुद्धी भगवंतांनी समजावून सांगितली आहे. सात्त्विक बुद्धी प्रवृत्ती व निवृत्ती यांतील भेद



जाणते. प्रवृत्ती म्हणजे प्रपंचात रमणे व निवृत्ती म्हणजे ममता, आसक्ती अहंकार सोडून निष्काम भावनेने परमात्म्याला प्राप्त करून घेण्यासाठी विरक्त होणे. राजा जनक अशांनी या दोन्हींचा भेद जाणून, बाहेरून प्रवृत्ती स्वीकारून प्रपंचातील कर्तव्ये पूर्ण केली व अंतःकरणातून निवृत्ती स्वीकारून भगवंताची भक्ती सिद्ध केली. सनकादिक काहींनी केवळ निवृत्तीमार्ग स्वीकारून निरंतर श्रवण, कीर्तन, भजन, निदिध्यासन करून परमात्म्याला प्राप्त करून घेतले. प्रवृत्ती व निवृत्ती यांतील भेदांचा विवेकाने जो स्वीकार करतो, त्याला या जगातील कोणत्या गोष्टी केव्हा स्वीकाराव्यात व कोणत्या गोष्टींचा त्याग करावा, याची नीरक्षीरविवेक बुद्धी असते. वर्ण, आश्रम, प्रकृती व देशकालपरिस्थिती यांना अनुसरून उचित कर्तव्य कोणते व त्याज्य कर्म कोणते याचा योग्य निर्णय ही सात्त्विक बुद्धी करते. स्वधर्माप्रमाणे योग्य ते कर्म करत असताना अशा व्यक्तींना कशाचेही भय नसते. अभय हा दैवी गुण आहे व तो अशा सात्त्विक बुद्धीच्या ठिकाणीच असतो. शुभाशुभ कर्मांच्या संबंधामुळे जीवाला जन्म-मृत्यूच्या चक्रामध्ये भटकत राहावे लागते. याला बंधन म्हटले आहे. निर्विषय होऊन, इंद्रियांवर विजय मिळवून, अनासक्त होऊन भगवंताच्या सान्निध्यात राहणे म्हणजे मोक्ष. सात्त्विक बुद्धी या बंध-मोक्ष यांतील भेद उत्तम जाणते. या सर्व गोष्टींचा निःसंशय निर्णय करण्याची बुद्धी सात्त्विक असते. पण जी बुद्धी धर्म-अधर्म, कल्याण-अकल्याण, सत्-असत्, प्रेय-श्रेय, कर्तव्य-अकर्तव्य जाणत नाही, ती राजस बुद्धी होय. आसक्ती, ममता यांमुळे अशा बुद्धीत स्वार्थ, पक्षपात, विषमता असे दोष येतात. रजोगुणाच्या संबंधामुळे, विवेक करण्यामध्ये ही बुद्धी अस्थिर, विक्षिप्त असते. अशा राजस बुद्धीचे फळ केवळ दुःखच असते. तामसी बुद्धी निषिद्ध पापकर्मांना धर्म मानते व शास्त्रविहित पुण्यकर्मांना अधर्म मानते. तमोवृत्तींनी युक्त असलेल्या अशा बुद्धीत सारेच काही विपरीत असते. अधर्माला धर्म, अकर्तव्याला कर्तव्य, अनित्याला नित्य, सत्च्या ठिकाणी असत्, दुःखाला सुख असे विपरीत ज्ञान अशा तामसी बुद्धीत भरलेले असते. अशी तामसी बुद्धी मनुष्याला अधोगतीला नेणारी असते.

मन, प्राण, इंद्रिये यांबरोबर सर्व भाव, क्रिया, वृत्ती यांच्यामध्ये संतुलन राखून, त्यांना दृढपणे स्थिर ठेवण्याची जी शक्ती किंवा जो गुण आहे त्याला 'धृती' असे म्हटले आहे. या शक्तीमुळेच महापुरुष आपल्या आदर्शापासून विचलित होत नाहीत. एकच अढळ ध्येय समोर ठेवून, मनाला विषयांमध्ये आसक्त व चंचल होऊ न देता, नेहमी आपल्याला स्वाधीन ठेवतात. अशी जी धृती ती सात्त्विक होय. या लोकीच्या किंवा परलोकीच्या विभिन्न प्रकारच्या

कामना, भोग यांच्या 'पूर्ती'साठी, जो आसक्तीने निरंतर काम करीत असतो त्यांची धृती ही राजस धृती होय. अशा धृतीने तो मोक्षाच्या, परम कल्याणाच्या साधनाकडे वळत नाही. रजोगुणांनी वेढलेली अशी धृती मनुष्याला कर्मबंधनात पाडते. दुष्टबुद्धीच्या मनुष्याकडून ज्या अवगुणांचा त्याग केला पाहिजे, असे दोष मनुष्य ज्या धारणाशक्तीमुळे धारण करतो ती तामस धृती होय. झोप, भीती, काळजी, दुःख आणि उन्मत्तपणा असे तामस भाव, मनुष्य या तामस धृतीमुळे सोडत नाही. अनर्थाला व दुःखाला कारणीभूत होणारी ही तामस धृती मनुष्याचा अधःपात घडवीत असते.

ज्ञान, कर्म, कर्ता, बुद्धी व धृती यांचे सात्त्विक, राजसी, तामसी असे तीन-तीन भेद क्रमशः सांगितल्यानंतर, भगवंत ३६ व्या श्लोकापासून सुखाचे असेच तीन भेद सांगत आहेत -

**सुखं त्विदानीं त्रिविधं शृणु मे भरतर्षभ ।**
**अभ्यासाद्रमते यत्र दुःखान्तंच निगच्छति ।।३६।।**
**यत्तदग्रे विषमिव परिणामेऽमृतोपमम् ।**
**तत्सुखं सात्त्विकं प्रोक्तमात्मबुद्धिप्रसादजम् ।।३७।।**
**विषयेन्द्रियसंयोगाद्यत्तदग्रेऽमृतोपमम् ।**
**परिणामे विषमिव तत्सुखं राजसं स्मृतम् ।।३८।।**
**यदग्रे चानुबंधे च सुखं मोहनमात्मनः ।**
**निद्रालस्यप्रमादोत्थं तत्तामसमुदाहृतम् ।।३९।।**

"हे भरतश्रेष्ठा! आता तीन प्रकारचे सुखही मी सांगतो, ते ऐक. ज्याच्या वारंवार अनुभवाने माणसाला आनंद होतो व त्याच्या दुःखाचा नाश होतो." ।।३६।।

"जे आरंभी विषासारखे वाटते, पण त्याचा परिणाम अमृतासारखा असतो, जे आत्मनिष्ठ बुद्धीच्या प्रसादाने उत्पन्न झालेले असते, त्या सुखाला सात्त्विक सुख म्हणतात." ।।३७।।

"जे सुख विषय आणि इंद्रिये यांच्या संयोगातून उत्पन्न होते, ते राजस सुख होय. ते आरंभी अमृतासारखे गोड वाटले, तरी त्याचा परिणाम विषासारखा अहितकारक असतो." ।।३८।।

"जे आरंभी आणि शेवटीही अंतःकरणाला मोह पाडणारे, झोप, आळस आणि कर्तव्याचा विसर यांतून उत्पन्न होणारे असते, ते तामस सुख होय." ।।३९।।

गीतेत भगवंतांनी सुखाच्या संदर्भात अनेक ठिकाणी भाष्य केले आहे. पाचव्या अध्यायात तर सुखाची व्याख्याच केली आहे. "ये हि संस्पर्शजा



भोगा दुःखयोनय एव ते ... कामक्रोधोद्भवं वेगं स युक्तः स सुखी नरः ।। (२२-२३). वस्तूपासून मिळणाऱ्या भोगांना आदि-अंत असल्यामुळे ते दुःखाचेच कारण होत. म्हणून शहाणी माणसे त्यात रमत नाहीत. मृत्यूपूर्वी ज्यांनी काम-क्रोध यांच्यावर विजय मिळविला आहे, अशी जितात्म माणसेच खरे सुखी होत. बाह्यपदार्थांपासून मिळणाऱ्या विषयानंदात आसक्त न होता, जे अंतर्मुखी होऊन शाश्वत आत्मसुखाचा अनुभव घेतात, त्यांनाच खरा आनंद मिळतो. अक्षय, अविरत टिकणारा आनंदाचा जो अनुभव आहे तो फक्त आत्म्याचाच आहे. कस्तुरी-मृगाच्या बेंबीत जसा सुगंध असतो तसा प्रसन्नतेचा झरा मनुष्याच्या अंतःकरणातच आहे. तो ज्याचा त्यानेच शोधावयाचा असतो. त्यासाठी साधनेची आवश्यकता असते. प्रसिद्ध तत्त्वज्ञ पास्कल म्हणतो की, "You can not make a man happy, he must learn how to be happy." "तुम्ही माणसाला सुखी करू शकत नाही. त्याला स्वतःलाच सुखी व्हायला शिकले पाहिजे." शाश्वत सुखाचा हा राजमार्ग गीतेने दाखविला आहे.

येथे ३६ व्या आणि ३७ व्या श्लोकांत सात्त्विक सुखाची व्याख्या केली आहे. ज्या सुखामध्ये रमणारा मनुष्य हा आध्यात्मिक, आधिदैविक आणि आधिभौतिक अशा सर्व प्रकारच्या दुःखांच्या प्रभावापासून मुक्त होतो व ज्या सुखाच्या अनुभवाचे फळ परमात्म्याची प्राप्ती होते, तेच सात्त्विक सुख. असे सुख मिळविताना सुरुवातीस अपार कष्ट सोसावे लागतात. तत्काळ प्राप्त होणाऱ्या सांसारिक विषयसुखांना आवरून, विवेक, वैराग्य, ज्ञान, शम, दम, तितिक्षा अशा साधनांनी आत्मजन्य सुखाचा वेध घ्यावा लागतो. संपूर्ण चित्तशुद्धी झाल्यानंतर या परमात्मसुखाचा अनुभव येतो. चित्तशुद्धी होत असतानाच साधकाच्या अंतःकरणात दैवी गुणांचा परिपोष होतो. सत्त्वगुणांच्या या प्रकटीकरणांतून त्याला अमृततत्त्वाचा लाभ होत राहतो. अंतःकरणात ज्ञान, शांती प्रकटते. सत्संग, स्वाध्याय, संकीर्तन, जप, ध्यान, चिंतन अशा साधनांनी भगवंताचे निरंतर स्मरण करत हे सुख अनुभवता येते.

३८ व्या आणि ३९ व्या श्लोकांत राजस आणि तामस सुखाची व्याख्या केली आहे. विषय व इंद्रिय यांच्या संयोगाने जे सुख मिळते ते राजस सुख होय. शब्द, स्पर्श अशा पंचेंद्रियांपासून मिळणारे सुख पशु-पक्षीही भोगत असतात. सांसारिक भोगवस्तूपासून मिळणारे असे सुख सुरुवातीस अत्यंत मोहकारक असते; पण ते प्राप्त झाल्यानंतर हळूहळू क्षीण व्हायला लागते. असे सुख भोगूनदेखील अतृप्ती राहते. पुनःपुन्हा भोगावेसे वाटते. एक इच्छा पूर्ण झाली की, त्यातच दुसऱ्या इच्छेचा जन्म होतो. ही शृंखला कधी संपत

नाही. वर्षानुवर्षे भोग भोगूनसुद्धा ययाती राजा अतृप्तच राहिला. राजस सुखाचे अंतिम फळ केवळ दुःख व अतृप्तीच असते. ही आसक्ती जेव्हा अमर्याद वाढते, तेव्हा ते तामससुखाचा आकार घेते. केवळ मोह-मूढतेमुळे मनुष्य तामस सुखाकडे वळतो. जेव्हा हा तमोगुण अधिकाधिक वाढायला लागतो, त्या वेळी त्याच्या हातून अधिकाधिक प्रमाद घडायला लागतात. विवेकशून्य होऊन अज्ञानाच्या अंधकारात चाचपडत सर्व निषिद्ध कर्मे करण्यात आयुष्याचा सारा वेळ खर्च करतो. कशाचाही विधिनिषेध न बाळगता आळस, निद्रा यांच्या आहारी जाऊन दिवास्वप्ने पाहण्यात तो सुख मानत असतो. असे सुख, परिणामीसुद्धा मोहित करणारे असते. असे हे प्रमादजनित सुख भोगकाळामध्ये आत्म्याला मोहित करणारे आहे. आसक्तीमुळे मनुष्याला अज्ञानमय अशा जडयोनीमध्ये जन्म घ्यावा लागतो.

२० ते ३९ या श्लोकांत भगवंतांनी ज्ञान, कर्म, कर्ता, बुद्धी, धृती, सुख... अशा मुख्य मुख्य पदार्थांचे सात्त्विक, राजस, तामस असे तीन-तीन भेद सांगून याचा उपसंहार ४० व्या श्लोकात केला आहे. संपूर्ण सृष्टीत प्रकृतीच्या या तीन गुणांना सोडून एकही वस्तू अस्तित्वात नाही हे सांगितले आहे.

या अध्यायाच्या ७ व्या श्लोकात त्यागाचे स्वरूप सांगतेवेळी भगवंतांनी ही गोष्ट सांगितली होती की, नियत कर्मांचा स्वरूपतः त्याग हा योग्य नव्हे. नियत कर्मे तर करीतच राहिले पाहिजे - पण ते करताना आसक्ती व फल यांचा त्याग केला पाहिजे आणि तो त्यागच वास्तविक त्याग होय. परंतु हे सांगताना भगवंतांनी नियत कर्माचे स्वरूप सांगितले नव्हते. कोणासाठी कोणते कर्म नियत आहे याचे वर्णन आता ४४ व्या श्लोकापर्यंत केले आहे. नंतर ४५ ते ४९ व्या श्लोकांत भक्तीच्या सहयोगाने कर्मयोगाप्रमाणे जे कर्म केले जाते त्याचे फल म्हणजे परमसिद्धीची प्राप्ती आहे, असे म्हटले आहे.

**न तदस्ति पृथिव्यां वा दिवि देवेषु वा पुनः ।**
**सत्त्वं प्रकृतिजैर्मुक्तं यदेभिः स्यात्त्रिभिर्गुणैः ।।४०।।**
**ब्राह्मणक्षतियविशां शूद्राणां च परंतप ।**
**कर्माणि प्रविभक्तानि स्वभावप्रभवैर्गुणैः ।।४१।।**
**शमो दमस्तपः शौचं क्षांतिरार्जवमेव च ।**
**ज्ञानं विज्ञानमास्तिक्यं ब्रह्मकर्म स्वभावजम् ।।४२।।**
**शौर्यं तेजो धृतिर्दाक्ष्यं युद्धे चाप्यपलायनम् ।**
**दानमीश्वरभावश्च क्षात्रं कर्म स्वभावजम् ।।४३।।**
**कृषिगौरक्ष्यवाणिज्यं वैश्यकर्म स्वभावजम् ।**
**परिचर्यात्मकं कर्म शूद्रस्यापि स्वभावजम् ।।४४।।**



**स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः ।**
**स्वकर्मनिरतः सिद्धिं यथा विन्दति तच्छृणु ।।४५।।**
**यतः प्रवृत्तिर्भूतानां येन सर्वमिदं ततम् ।**
**स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानवः ।।४६।।**
**श्रेयान् स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् ।**
**स्वभावनियतं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम् ।।४७।।**
**सहजं कर्म कौन्तेय सदोषमपि न त्यजेत् ।**
**सर्वारम्भा हि दोषेण धूमेनाग्निरिवावृताः ।।४८।।**

"या पृथ्वीवर किंवा स्वर्गात देवलोकीही देवामध्ये अशी कोणतीच वस्तू नाही की, जी प्रकृतीच्या या तीन गुणांशिवाय असेल." ।।४०।।

"हे अर्जुना! ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र यांची कामे स्वभावजन्य गुणांप्रमाणे निरनिराळी केली गेली आहेत." ।।४१।।

"मनोनिग्रह, इंद्रियनिग्रह, धर्मासाठी कष्ट सहन करणे, दुसऱ्याच्या अपराधांना क्षमा करणे, कायावाचामने सरळ असणे, शास्त्राचे ज्ञान करून घेणे, आत्मतत्त्वाचा अनुभव घेण्याची साधना करणे, शास्त्राने सांगितलेल्या विषयावर श्रद्धा ठेवणे, ही ब्राह्मणाची स्वभावानुसार प्राप्त झालेली कर्मे आहेत." ।।४२।।

"पराक्रम, तेजस्विता, धैर्य, चतुरता, युद्धातून पळ न काढणे, दान देणे आणि प्रजेवर सत्ता चालविणे ही क्षत्रियांची स्वभावतः प्राप्त झालेली कर्मे आहेत." ।।४३।।

"शेती करणे, जनावरे पाळणे आणि व्यापार करणे ही वैश्यांची स्वाभाविक कामे होत. तसेच सेवा करणे हे शूद्राचे स्वाभाविक काम होय." ।।४४।।

"आपापल्या (स्वाभाविक) कामात तत्पर, रत असलेल्या माणसाला परम सिद्धी मिळते. आपापल्या स्वाभाविक कर्मात तत्पर राहिल्याने माणसाला सिद्धी कशी मिळते, ते ऐक." ।।४५।।

"ज्याच्यापासून सर्व भूतांची उत्पत्ती झाली, ज्याने हे सर्व विश्व व्यापले आहे. त्याची पूजा स्वधर्मानुसार प्राप्त झालेल्या कर्मांनी केली, म्हणजे मनुष्याला सिद्धी मिळते." ।।४६।।

"उत्तम प्रकारे आचरलेल्या दुसऱ्याच्या धर्मापेक्षा, आचरणात थोडी उणीव असली तरी आपला धर्म (गुणस्वभावानुसार प्राप्त झालेले कर्म) श्रेष्ठ आहे. गुणस्वभावानुसार प्राप्त झालेले कर्म करणाऱ्याला पाप लागत नाही." ।।४७।।

"हे अर्जुना! गुणकर्मविभागानुसार सृष्टिकर्त्याने जे कर्म आपल्यासाठी नेमलेले आहे, ते सदोष असले तरी सोडून देऊ नये. कारण धुराने जसा विस्तव,

तशी सर्वच कामे कोणत्या ना कोणत्या दोषाने व्यापलेली असतात." ।।४८।।

प्रकृतीच्या त्रिगुणांपासून मुक्त असा एकही प्राणी संपूर्ण सृष्टीत नाही. सत्त्व, रज, तम या गुणभेदांनुसार वर्णव्यवस्था निर्माण झाली. मनुष्य जे जे कर्म करतो, त्याप्रमाणे त्याच्या अंतःकरणात तसेच संस्कार होतात व त्या संस्कारांनुसार तसा स्वभाव बनतो. जन्म-जन्मांतरीच्या पूर्वकर्मांनुसार जसा स्वभाव असतो, तसेच गुण अधिक प्रभावाने पुढील जन्मात त्याच्यात येतात. जशा गुणवृत्ती असतात तसेच कर्म त्याच्या हातून होते. मनाचा निग्रह करून, इंद्रियांना संयमित करून, धर्मपालनासाठी आनंदाने कष्ट घेत, अंतर्बाह्य शुद्ध, पवित्र राहून, दुसऱ्यांच्या अपराधांना क्षमा करीत, शरीर, वाणी इ. च्या व्यवहारात सरळपणा ठेवून, वेद-शास्त्राचे ज्ञान घेत, यज्ञविधींना जाणून जे परमात्म्यावर अव्यभिचारी भक्ती करतात, अशा सत्त्वप्रधान पुरुषांची कर्मे ही ब्राह्मणांची कर्मे आहेत. शौर्य, तेज, धैर्य, चातुर्य, युद्धातून पलायन न करणे, दान देणे, प्रजेचे रक्षण करणे ही सर्व क्षत्रियांची स्वाभाविक कर्मे आहेत. "क्षतात् त्रायते इति क्षत्रियः" दुःखापासून प्रजेचे जे रक्षण करतात ते क्षत्रिय होत. तर शेती, गोपालन व क्रयविक्रयरूप सत्य व्यवहार ही वैश्यांची स्वाभाविक कर्मे होत. तसेच सर्व वर्णांची सेवा करणे हे शूद्रांचे स्वाभाविक कर्म आहे. भौतिक जीवनव्यवहाराविषयीचा हा व्यवहारक्रम इथे भगवंतांनी सांगितला आहे. हा व्यवहारक्रम सर्वच मानवसमाजात पाहता येईल. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र - हे भेद गुण व कर्मावर आधारित आहेत, जन्मावर नाहीत. चौथ्या अध्यायात भगवंतांनी स्पष्ट सांगितले आहे- "चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः" (श्लो. १९) ("चार वर्णांची ही व्यवस्था गुण व कर्म यांच्या भेदाप्रमाणे मी निर्माण केली आहे.") सध्या भारतात ठाम झालेला जन्मानुसार जातिभेद (वर्णभेद) म्हणजे या भगवद्व्यवस्थेची विकृती केली गेलेली आहे, असेच म्हणता येईल. या जातिभेदानुसार ब्राह्मण म्हणून जन्मास आलेले कोणी गुणकर्मानुसार शूद्रही होऊ शकतील आणि शूद्र म्हणून जन्मात आलेले कोणी गुणकर्मानुसार ब्राह्मण. जन्मानुसार कुठलीही जात असली तरी, मनुष्याचे वास्तविक वर्ण त्याचे गुण व कर्म हेच ठरवू शकतात.

अशा प्रकारे चारी वर्णांच्या स्वाभाविक कर्मांचे वर्णन करून, आता ४५ व ४६ व्या श्लोकात भक्तियुक्त कर्मयोगाचे स्वरूप व त्याचे फळ भगवंतांनी सांगितले आहे. हे दोन श्लोक, कर्मयोगाचा सारभूत सिद्धान्त सांगणारे मांगलिक श्लोक आहेत. कोणत्याही वर्णाचा कोणीही मनुष्य स्वधर्माचे पालन करून परमेश्वरप्राप्ती करून घेऊ शकतो. प्रत्येकात भगवंताचा अंश असल्याने



प्रत्येक जण भगवत्प्राप्तीचा अधिकारी आहे. वाट्याला आलेले व शिवाय शास्त्राने निश्चित केलेले स्वाभाविक, विहित कर्म जो निष्ठेने व प्रीतिपूर्वक करतो, त्याला सिद्धी प्राप्त होते. श्री ज्ञानेश्वर महाराजांनी या श्लोकांवर सुंदर निरूपण केले आहे. ते म्हणतात,

**अगा जया जे विहित । तें ईश्वराचे मनोगत ।**
**म्हणौनि केलिया निभ्रांत । सांपडेचि तो ।।** (९१०-अ.१८)

"अरे अर्जुना! ज्याला जे उचित कर्म सांगितले आहे तेच त्याने करावे असे ईश्वराचे मनोगत आहे. म्हणून ते विहित कर्म केले म्हणजे, त्याला निःसंशय ईश्वर प्राप्त होतो."

असे विहित कर्म करणे म्हणजे ईश्वराचीच आज्ञा पाळणे होय. ज्या ईश्वराच्या योगाने हे सर्व जग आतबाहेर पूर्णपणे भरलेले आहे, त्या ईश्वराची पूजा स्वकर्मरूपी फुलांनी केली असता त्याला सिद्धी प्राप्त होते, हे सांगताना ज्ञानेश्वर माऊली म्हणतात,

**तया सर्वात्मका ईश्वरा । स्वकर्मकुसुमांची वीरा।**
**पूजा केली होय अपारा । तोषालागी ।।** (९१७-अ.१८)

"हे वीरा अर्जुना! त्या सर्वात्मक ईश्वराची स्वकर्मरूपी फुलांनी पूजा केली असता, ती पूजा त्याच्या अपार संतोषाला कारणीभूत होते."

या स्वधर्मरूपी यज्ञानेच भगवंत संतुष्ट होतो. असे कर्म नेहमी पूजाबुद्धीने व निष्काम भावाने केले पाहिजे. दुसऱ्याच्या धर्मापेक्षा कदाचित वैगुण्य असलेलाही आपला धर्म आचरणेच चांगले. स्वधर्माचे आचरण केल्यामुळे पाप लागत नाही. म्हणून आपले नियत कर्म दोषयुक्त जरी असले तरी त्याचा त्याग करू नये. कारण अग्नी जसा धुराने आच्छादिलेला असतो, त्याप्रमाणे सर्वच कर्मे काही ना काही दोषाने युक्त असतातच. वर्ण, आश्रम, स्वभाव, परिस्थिती यांना अनुसरून ज्याच्यासाठी जे कर्म सांगितले आहे, त्याच्यासाठी तेच कर्म हे सहज कर्म आहे. स्वधर्म, नियतकर्म, विहित कर्म या सर्वांचे वाचक येथे 'सहज' या नावाने केले आहे.

अर्जुनाच्या जिज्ञासेप्रमाणे भगवंतांनी १२ व्या श्लोकापर्यंत 'संन्यास' व 'त्याग' यांचे तत्त्व समजावून सांगितले. सर्वच 'काम' म्हणजे कामनायुक्त कर्मांच्या स्वरूपतः त्यागाला संन्यास असे सामान्यतः म्हटले जाते, पण कर्तव्य-कर्मांचा स्वरूपतः त्याग न करता फक्त आसक्ती व कर्मफलाचा त्याग म्हणजेच खरा त्याग हे भगवंतांनी इथे सांगितले. यज्ञ, तप, दान आणि नियत कर्तव्य-कर्म केलीच पाहिजेत, कारण ती चित्तशुद्धिकारक आहेत, असे आपले निश्चित मत भगवंतांनी प्रकट केले. नंतर १३ व्या

श्लोकापासून ४० व्या श्लोकापर्यंत सत्त्व, रज, तम या गुणांप्रमाणे भगवंतांनी ज्ञान, कर्म, कर्ता, बुद्धी, धृती व सुख यांचे निरूपण केले. ४१ ते ४८ या श्लोकांत गुणस्वभावानुसार झालेली चातुर्वर्ण्य व्यवस्था आणि त्यानुसार नेमलेल्या स्वधर्मपालनाचे महत्त्व सांगितले. स्वधर्मानुसार नेमलेले आपले कर्तव्य-कर्म आसक्ती व फलेच्छा टाकून, ईश्वराची पूजा म्हणून करीत राहिल्याने शेवटी भगवत्प्राप्ती होते, हेही सांगितले.

कर्मांना प्रारंभ केला नाही किंवा कर्मांचा संन्यास (त्याग) केला म्हणजे नैष्कर्म्यसिद्धी प्राप्त होत नाही, हे भगवंतांनी पूर्वीच सांगितले आहे (गीता अ. ३ श्लो. ४). खरे म्हणजे काही न काही कर्म केल्यावाचून कोणीही क्षणभरदेखील राहत नाही. देह आहे तोपर्यंत प्रकृतिगुणांमुळे कर्मे होतच राहतात (३.५). परंतु आसक्ती व फलेच्छा सोडून, साधक कर्म करीत असला तरी तो काहीच करीत नाही, अशी मानसिक स्थिती त्याची राहते (४.२०). हीच खरी नैष्कर्म्यस्थिती, जो मूढ फक्त कर्मेंद्रिये आवरून मनाने इंद्रियविषयांचे चिंतन करीत राहतो, तो 'मिथ्याचारी' (लबाड) आहे, निष्कर्मी नव्हे (३.६). आता ५५ व्या श्लोकापर्यंत नैष्कर्म्यसिद्धी, त्याचे खरे स्वरूप व त्याच्या फलाविषयी भगवंत वर्णन करीत आहेत -

**असक्तबुद्धिःसर्वत्र जितात्मा विगतस्पृहः ।**
**नैष्कर्म्यसिद्धिं परमां संन्यासेनाधिगच्छति ॥४९॥**
**सिद्धिं प्राप्तो यथा ब्रह्म तथाप्नोति निबोध मे ।**
**समासेनैव कौंतेय निष्ठा ज्ञानस्य या परा ॥५०॥**
**बुद्ध्या विशुद्धया युक्तो धृत्यात्मानं नियम्य च ।**
**शब्दादीन्विषयांस्त्यक्त्वा रागद्वेषौ व्युदस्य च ॥५१॥**
**विविक्तसेवी लघ्वाशी यतवाक्कायमानसः ।**
**ध्यानयोगपरो नित्यं वैराग्यं समुपाश्रितः ॥५२॥**
**अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं परिग्रहम् ।**
**विमुच्य निर्ममःशान्तो ब्रह्मभूयाय कल्पते ॥५३॥**
**ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा न शोचति न कांक्षति ।**
**समः सर्वेषु भूतेषु मद्भक्तिं लभते पराम् ॥५४॥**
**भक्त्या मामभिजानाति यावान्यश्चास्मि तत्त्वतः ।**
**ततो मां तत्त्वतो ज्ञात्वा विशते तदनंतरम् ॥५५॥**

श्री भगवान म्हणाले,

"कोठेही आसक्ती न ठेवता, मन ताब्यात आणून, निष्काम बुद्धीने जो कर्म करतो, त्याला कर्मफलाचा त्याग केल्यामुळे ज्ञानयोग्याला मिळणारी श्रेष्ठ नैष्कर्म्यसिद्धी प्राप्त होते." ॥४९॥



"याप्रमाणे सिद्धी प्राप्त झाल्यावर साधकाला ज्ञानाचे अंतिम ध्येय जे ब्रह्म ते कसे प्राप्त होते, हे माझ्याकडून थोडक्यात समजून घे." ॥५०॥

"शुद्ध बुद्धीने युक्त होऊन साधकाने सात्त्विक धृतीने अंतःकरण ताब्यात ठेवावे. शब्दादी विषयांचे सेवन न करता व प्रीती आणि द्वेष दूर करून." ॥५१॥

"विविक्त म्हणजे एकान्त स्थळी राहणारा, मर्यादित आहार सेवन करणारा, काया, वाचा व मन ताब्यात ठेवणारा आणि नित्य ध्यानयुक्त व विरक्त." ॥५२॥

"(तसेच) अहंकार, बल, दर्प, काम, क्रोध व परिग्रह यांचा त्याग करून ममत्वरहित व शांत झालेला, ब्रह्मपद प्राप्त होण्यास योग्य ठरतो." ॥५३॥

"ब्रह्मसाक्षात्काराने प्रसन्नचित्त झालेला योगी कशाबद्दलही दुःख करीत नाही की कशाची अपेक्षा करीत नाही. त्याचा सर्व प्राणिमात्रांविषयी समभाव असतो. त्याला माझी श्रेष्ठ भक्ती प्राप्त होते." ॥५४॥

"अशा भक्तीमुळे 'मी कोण आहे व केवढा आहे' हे त्याला तत्त्वतः कळते. आणि हे तत्त्वतः कळल्यावर तो माझ्याशी एकरूप होतो." ॥५५॥

भगवान म्हणतात की, कोठेही आसक्ती न ठेवता, मन ताब्यात आणून निष्काम बुद्धीने कर्मे केली म्हणजे अशा साधकाला नैष्कर्म्यसिद्धी प्राप्त होते. कर्मे करूनही असा पुरुष संसारात असा राहतो जसे कमलपत्र पाण्यात राहते. पाण्यात असतानाही कमलपत्र पाण्याला चिकटत नाही (५.१०). त्याचप्रमाणे कर्मफलाचा त्याग केल्यामुळे कर्मे करूनही असा साधक निर्लिप्तच राहतो, आणि म्हणून शुभ-अशुभ असे कोणतेही फल अशा आसक्तिविरहित कर्मामुळे उत्पन्न होत नाही (१८.१२). असे कर्म नेहमी मनःशुद्धिकारकच होते (५.११).

याप्रमाणे नैष्कर्म्यसिद्धी प्राप्त झाल्यावर म्हणजे अनासक्त स्थितीत राहण्याचा अभ्यास झाल्यावर, ज्ञानाचे जे अंतिम ध्येय ब्रह्म ते कसे प्राप्त होते हे आता भगवंत सांगतात. ब्रह्मप्राप्तीसाठी आवश्यक असलेल्या साधनसामग्रीचे वर्णन भगवंत इथे करीत आहेत.

भगवान सांगतात की, विशुद्ध बुद्धी ही या पात्रतेसाठी प्रथम सामग्री आहे. अहंकार व वासनारहित बुद्धी असणे हीच विशुद्ध बुद्धी. पूर्वार्जित वासनांच्या संस्कारांनी रहित असलेल्या अंतःकरणाला विशुद्धबुद्धिसंपन्न म्हणायचे. मनोनिग्रह करणे ही दुसरी सामग्री. मनाचे चंचलत्व, त्यातील दोष काढून टाकून त्याचे शुद्धीकरण, विभूतीकरण, उदात्तीकरण करणे व असे शुद्ध मन भगवंताच्या चरणी अर्पण करणे हाच मनोनिग्रह होय. तिसरी

सामग्री म्हणजे शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध ह्या विषयांतले विषयपणा, भोग्यपणा व उपभोगिता काढून टाकणे ही सांगितली. सृष्टीकडे पाहताना भोगापेक्षा भक्तीने पाहावे यातील हे मर्म भगवंतांनी सांगितले आहे. चौथी सामग्री म्हणजे 'रागद्वेषौ व्युदस्य च'. कशाचीही जशी आसक्ती नसावी तसा कुणाचाही द्वेष नसावा. इंद्रियांच्या प्रत्येक भोगांमध्ये राग व द्वेष हे दोन्ही लपून राहिलेले असतात. ते साधकाचे महान शत्रू होत (अ.३-३४) म्हणून ह्या दोन्हींचाही त्याग करावा. नंतरची सामग्री, 'विविक्तसेवी' म्हणजे साधनेसाठी निवडक व एकान्त स्थळी जाणे आणि 'लघ्वाशी' म्हणजे मिताहारी होणे. युक्त आहाराबरोबरच इंद्रियांचा आहारसुद्धा मिताहार असावयास हवा. सर्वच इंद्रियांचा विषयांशी संबंध आहे. त्यामुळे हे विषयभोग संयमित, युक्त असावेत. सातवी सामग्री आहे 'यतवाक्कायमानसः' म्हणजे सात्त्विक धारणेने अंतःकरण आणि बहिःकरण यांचा संयम करणे. अशा संयमाने मन, इंद्रिये आणि शरीर यांना स्वाधीन करून त्यांना निश्चित ध्येयप्राप्तीकडे अविचल राहण्याचे वळण लावणे हा गुण योग्याच्या ठिकाणी असतो. आठवी सामग्री 'ध्यानयोगपरो नित्यं' म्हणजे नित्यनिरंतर परमेश्वराचे चिन्तन करणे आणि नववी सामग्री 'वैराग्यं समुपाश्रितः' होय. वैराग्य म्हणजे विगत-राग. कोणत्याही प्रकारची अभिलाषा, मोह, आसक्ती नसणे. निःस्पृह भावनेने निरंतर वैराग्यामध्ये मग्न राहणे म्हणजे रागद्वेषाचा नाश करून चांगल्या प्रकारे दृढ वैराग्याचा आश्रय, आधार घेणे होय. अशी स्थिती प्राप्त झाल्यानंतर साधकाच्या ठिकाणी अहंकार, बल, घमेंड, काम, क्रोध, परिग्रह यांना स्थान राहत नाही. शरीर, इंद्रिये आणि अंतःकरण यांच्या ठिकाणी जी आत्मबुद्धी आहे, तो अहंकार होय. हा अहंकार अज्ञानी मनुष्यालाही नाचवितो व ज्ञानी माणसाच्याही कंठी झोंबतो. या देहाभिमानामुळेच तो केल्या जाणाऱ्या कर्मांचा स्वतःला कर्ता मानतो. अशा देहाभिमानाचा त्याग करणे म्हणजेच अहंकाराचा नाश करणे म्हणजे 'मी व माझे' यांचा त्याग करणे होय. याच अहंकारामुळे अभिमान, गर्व यांचा जन्म होतो. मोठेपण मिळविण्यासाठी शक्ती, अधिकार यांचा वापर करून मनुष्य दुसऱ्यावर अन्याय करतो. प्रचंड अभिलाषा, आशा-अपेक्षा ठेवून सतत 'कामा'च्या अधीन होतो. कामतृप्त न झाल्यामुळे क्रोधाच्या आहारी जातो. या सर्व वृत्तींबरोबर 'परिग्रह' हाही एक रोग आहे. सांसारिक भोगांच्या सामग्रीचे संग्रह करणे म्हणजे परिग्रह आणि संग्रह न करणे म्हणजे अपरिग्रह! संयम, मर्यादा यामुळेच जीवनात सौंदर्य येते. हे बंधन, मर्यादा, संयम जिथे सुटतो तेथे असंतोष, अशांती, दुःख, कलह, क्लेश, पीडा, संताप... हे सगळे दुर्गुण ठाण मांडतात व



वातावरण बिघडवून टाकतात. जीवन ही तशी एक यात्राच आहे. या यात्रेत जेवढ्या वस्तू कमी, तेवढे सुख जास्त! जेवढा अपरिग्रह, तेवढा अधिक संतोष, अशा प्रकारे या सर्वांचा त्याग करून ममतारहित व शांतियुक्त असा हा पुरुष सच्चिदानंदघन ब्रह्ममध्ये एकरूप होऊन ब्रह्मभाव प्राप्त करून घेण्यास पात्र ठरतो.

जो सच्चिदानंद ब्रह्ममध्ये अभिन्न भावनेने स्थित होतो त्याला कशाचीही इच्छा, आकांक्षा नसते. सर्व भूतांच्या ठिकाणी एकच चैतन्य पाहणारा असल्यामुळे जगातील कोणत्याही वस्तूबद्दल त्याला भिन्न प्रचीती म्हणजे द्वैत भाव राहत नाही. त्यामुळे तो कोणत्याही स्थितीमध्ये आणि कोणत्याही कारणाने किंचितही चिंता किंवा शोक करीत नाही. असा सर्वत्र समबुद्धी झालेला योगी निरंतर शुद्ध, पवित्र व प्रसन्न राहून भगवंताच्या पराभक्तीला प्राप्त होतो. त्या पराभक्तीच्या योगाने तो भगवंताला तत्त्वतः जाणतो व शेवटी ईश्वराशी एकरूप होतो.

आता भगवंत अर्जुनाने भक्तिप्रधान कर्मयोग ग्रहण करावा यासाठी त्याचा महिमा, पुढील श्लोकांतून सांगत आहेत -

**सर्वकर्माण्यपि सदा कुर्वाणो मद्व्यपाश्रयः।**
**मत्प्रसादादवाप्नोति शाश्वतं पदमव्ययम् ॥५६॥**
**चेतसा सर्वकर्माणि मयि संन्यस्य मत्परः ।**
**बुद्धियोगमुपाश्रित्य मच्चित्तः सततं भव ॥५७॥**
**मच्चित्तः सर्वदुर्गाणि मत्प्रसादात्तरिष्यसि ।**
**अथ चेत्त्वमहंकारान्न श्रोष्यसि विनंक्ष्यसि ॥५८॥**
**यदहंकारमाश्रित्य न योत्स्य इति मन्यसे ।**
**मिथ्यैष व्यवसायस्ते प्रकृतिस्त्वां नियोक्ष्यति ॥५९॥**
**स्वभावजेन कौंतेय निबद्धः स्वेन कर्मणा ।**
**कर्तुंनेच्छसि यन्मोहात्करिष्यस्यवशोऽपि तत् ॥६०॥**
**ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति ।**
**भ्रामयन्सर्वभूतानि यंत्रारूढानि मायया ॥६१॥**
**तमेव शरणं गच्छ सर्वभावेन भारत ।**
**तत्प्रसादात्परां शांतिं स्थानं प्राप्स्यसि शाश्वतम् ॥६२॥**
**इति ते ज्ञानमाख्यातं गुह्याद्गुह्यतरं मया ।**
**विमृश्यैतदशेषेण यथेच्छसि तथा कुरु ॥६३॥**

श्री भगवान म्हणाले,

''अशा रीतीने केवळ माझाच आश्रय घेतलेला योगी नेहमी सर्व कर्मे

करीत राहिला तरी (तो कर्मबंधनात न पडता) माझ्या कृपेने शाश्वत व अविनाशी पदाला प्राप्त होतो.'' ।।५६।।

''हे अर्जुना! मनाने सर्व कर्म मला अर्पण कर. मलाच सर्वस्व मान. बुद्धियोगाचा आश्रय करून नेहमी चित्त माझ्यात ठेव.'' ।।५७।।

''माझ्याच ठिकाणी तुझे चित्त ठेवलेस म्हणजे माझ्या कृपेने सर्व दुस्तर संकटातून तू तरून जाशील पण अहंकारामुळे माझे न ऐकशील तर मात्र नाश पावशील.'' ।।५८।।

'' 'मी लढणार नाही' असे जे तू अहंकारामुळे मानीत आहेस, तो तुझा निश्चय फुकट आहे, कारण तुझा स्वभाव क्षत्रियाचा आहे. तो तुला युद्ध करायला भाग पाडील.'' ।।५९।।

''हे कुंतीपुत्रा! आपल्या स्वभावतः प्राप्त असलेल्या कर्माने तू निश्चितपणे बद्ध झालेला आहेस. त्यामुळे मोहामुळे जे तू करू इच्छित नाहीस, ते तुला परतंत्र (प्रकृतीच्या आधीन) होऊन करावेच लागेल.'' ।।६०।।

''हे अर्जुना! ईश्वर सर्वभूतांच्या हृदयात राहतो. तो आपल्या मायेने सर्व भूतांना यंत्रावर चढविल्याप्रमाणे फिरवीत असतो.'' ।।६१।।

''हे भरतश्रेष्ठा! सर्वभावे करून तू त्यालाच शरण जा. त्याच्या कृपेने तुला परम शांती आणि शाश्वत ब्रह्मपद मिळेल.'' ।।६२।।

''याप्रमाणे गुह्यातले गुह्य असे हे ज्ञान तुला मी सांगितले. याचा पूर्ण विचार करून तुझ्या इच्छेला येईल तसे कर.'' ।।६३।।

जो केवळ भगवंताचाच आश्रित झालेला आहे असा योगी आसक्ती व कामना सोडून सर्व कर्मे आणि त्यांचे फळ भगवंताला अर्पण करतो. सर्व कर्मे करूनही तो भगवंताला प्राप्त करून घेतो. या ५६ व्या श्लोकावरील निरूपणात, श्री ज्ञानेश्वरांनी भक्तिप्रधान कर्मयोगाची नेमक्या शब्दांत मांडणी केली आहे. ते म्हणतात,

**स्वकर्मांचा चोखौळी । मज पूजा करूनि भली ।**
**तेणें प्रसादें आकळी । ज्ञाननिष्ठेतें** ।।(१२४७- अ.१८)
**ते ज्ञाननिष्ठा जेथ हातवसे । तेथ भक्ति माझी उल्लासे ।**
**तिया मजसी समरसें । सुखिया होय** ।। (१२४८- अ.१८)

''स्वकर्मरूपी पवित्र फुलांनी माझी चांगली पूजा करून माझ्या प्रसादाने तो ज्ञाननिष्ठा प्राप्त करून घेतो. तो ज्ञानमार्ग जेव्हा हस्तगत होतो तेव्हा माझी भक्ती प्रकट होते व त्या भक्तीच्या योगाने माझ्याशी समरस होऊन तो सुखी होतो.''

कर्मे करूनसुद्धा परमपद मिळविण्याचा हा भक्तिप्रधान कर्मयोग भगवंतांनी



सांगितला व त्याप्रमाणे सर्व कर्मे मनाने भगवंताला अर्पण करावयास अर्जुनास सांगितले. यासाठी बुद्धियोगाचा अवलंब करण्याची सूचना भगवंतांनी केली. दुसऱ्या अध्यायात बुद्धियोग सांगितला होता.

सिद्धी-असिद्धी, सुख-दुःख, यश-अपयश, लाभ-हानी अशा सर्व द्वंद्वांमध्ये समभावाने, समबुद्धीने स्थिर राहणे हाच बुद्धियोग. या बुद्धियोगात स्थिर राहून, मन व बुद्धी संपूर्णपणे भगवंताला अर्पण करून, सर्व कर्मे करीत असताना नित्य-निरंतर त्यांचे स्मरण ठेवले तर अर्जुन सर्व संकटांतून पार होईल, असे आश्वासन भगवंत देत आहेत. परंतु अहंकारामुळे अर्जुनाने जर हे ऐकले नाही तर त्याचा सर्वनाश हा अटळ आहे, हेही स्पष्ट करतात.

कारण दुसऱ्या अध्यायात सांगितल्याप्रमाणे, धर्माला अनुकूल असे हे युद्ध न केल्यास अर्जुनाला शांती तर मिळणारच नाही, उलट, तो स्वधर्म व कीर्ती गमावून पापाचा भागीदार होईल. इतकेच नव्हे तर सर्व लोक नेहमी त्याची दुष्कीर्ती गात राहतील आणि दुष्कीर्ती तर संभावित माणसाला मरणापेक्षाही मरण होय.

भगवंत हेही सांगतात की, अर्जुनाने जर अहंकाराच्या अधीन होऊन युद्ध सोडले, तरी क्षत्रिय-स्वभाव त्याला शेवटी लढायला भाग पाडीलच. मोहाने जे तो करू इच्छित नाही तेच आपल्या प्रकृतीच्या स्वाधीन होऊन त्याला करावेच लागेल. म्हणून युद्ध सोडणे हा विकल्प वास्तविक त्याच्याकडे नाहीच. खरे म्हणजे, सर्व प्राण्यांच्या हृदयात राहून यंत्रावर चढविल्याप्रमाणे ईश्वरच आपल्या मायेने त्यांना चालवीत असतो. म्हणून भगवंत म्हणतात की, ''अर्जुना! मनःशांतीसाठी तू सर्वभावाने त्यालाच शरण जा. त्याच्या अनुग्रहाने परम शांती व शाश्वत पद तुला प्राप्त होईल.''

आपण जगाच्या म्हणजे प्रकृतीच्या व्यवहाराकडे नजर दिली असता असे आढळून येते की, आपण न इच्छिता किंबहुना आपल्याला नको असताही शेकडो, हजारो गोष्टी, जगात चालल्या असून त्यांच्या व्यापाराचे परिणाम आपणावरही घडत असतात, किंवा त्या व्यापारांतलाच काही भाग आपणास करावा लागतो, 'नाही' म्हणून चालत नाही. अशा वेळी ही सर्व परमेश्वराची इच्छा समजून शहाणा पुरुष आपली बुद्धी निर्मल ठेवून, आणि सुख-दुःख सारखेच समजून आपले कर्तव्य करीत असतो. हाच मनःशान्तीचा उपाय होय.

या सर्व उपदेशाचा उपसंहार करताना भगवंत म्हणतात की, ''मी गूढाहून अत्यंत गूढ असे हे ज्ञान तुला सांगितले आहे. त्याचा पूर्णपणे विचार करून तुझ्या इच्छेला येईल त्याप्रमाणे तू कर.'' दुसऱ्या अध्यायातील ११ व्या श्लोकापासून प्रारम्भ करून येथपर्यंत, अर्जुनाला आपले गुण, प्रभाव, तत्त्व,

स्वरूप यांचे रहस्य म्हणजे संपूर्ण आत्मज्ञान भगवंतांनी समजावले. कर्मयोग, ज्ञानयोग, ध्यानयोग, भक्तियोग यांचे सविस्तर निरूपण केले. संपूर्ण ज्ञान-विज्ञान विशद केले आणि सद्यःस्थितीत अर्जुनाचे कर्तव्य काय, हेही सांगितले. आता काय करावे याचा निर्णय अर्जुनालाच करावा लागेल.

अर्जुनाने आपल्या कर्तव्याविषयी योग्य निर्णय घ्यावा यासाठी भगवंतांनी दुसऱ्या अध्यायातील ११ व्या श्लोकापासून अठराव्या अध्यायाच्या ६२ व्या श्लोकापर्यंत, त्याला गुह्यांतील गुह्य सर्व ज्ञान सांगितले आणि ६३ व्या श्लोकात म्हटले की, ''मी तुला हे जे ज्ञान सांगितले, त्यावर पूर्ण विचार करून आता तू इच्छेला येईल, तसे कर.''

कुरुक्षेत्रावर मोठ्या उत्साहाने अधर्मी कौरवांविरुद्ध धर्मयुद्ध करण्यासाठी आलेल्या अर्जुनाने जेव्हा पाहिले की, दोन्ही सैन्यांमध्ये आपलेच कुटुंबीय आहेत आणि या युद्धामुळे कुरुवंशाचाच नाश होणार आहे, तेव्हा या युद्धामुळे होणाऱ्या भयंकर दुष्परिणामांच्या विचाराने तो अत्यंत व्याकूळ झाला. '' हे युद्ध करणे तर महापाप आहे,'' असा तो विचार करू लागला. या युद्धाने कोण सुखी होणार आहे? (१.३७) या युद्धात अर्जुनाला आपले परमपूज्य पितामह आणि गुरू द्रोणाचार्य यांच्याशी युद्ध करणेही भाग होते. आणि हे सर्व कशासाठी? तर आपल्याच गुरुजनांना आणि कुटुंबीयांना मारून त्यांच्या रक्ताने माखलेले भोग भोगण्यासाठीच. (२.५) शिवाय पांडवांकडे फक्त सात अक्षौहिणी सेना होती आणि कौरवांकडे ११ अक्षौहिणी सेना. त्यामुळे पांडवांकडे धर्म आणि न्याय असूनसुद्धा त्यांचाच विजय होईल, हे कोण सांगू शकणार होता? (२.६)

त्यामुळे अर्जुनाने दुसऱ्या अध्यायाच्या ७ व्या श्लोकात श्रीकृष्णांना स्पष्टपणे सांगितले,''मी माझ्या कर्तव्याविषयी विमूढ झालो आहे. मी काय करावे, हेच मला कळेनासे झाले आहे. म्हणून हे कृष्णा, मी शिष्य म्हणून आपल्याला शरण आलो आहे. मला योग्य ते मार्गदर्शन करा.''

त्या वेळी श्रीकृष्णांनी निश्चयाने त्याला सांगितले, ''तुला युद्ध केलेच पाहिजे. कारण हे धर्मयुद्ध असल्याने हे तुझे पवित्र कर्तव्य आहे (२.३१). या संदर्भात त्यांनी अर्जुनाला कर्मयोग, ध्यानयोग, भक्तियोग, ज्ञानयोग आदी सर्व योगांच्या बाबतीत सांगितले. आत्म्याचे अमरत्व, शरीराचे विनाशित्व, सृष्टीची उत्पत्ती, स्थिती, नाश आदी सर्व ज्ञान-विज्ञान समजावून सांगितले आणि हेही सांगितले की, श्रीकृष्ण स्वतः ईश्वराचे अवतार असून धर्मस्थापनेसाठी त्यांनी जन्म घेतला आहे (४.७-८); ते पांडवांच्या पक्षात असल्याने पांडवांचा जय निश्चित आहे (११.३४) - अर्जुनाला फक्त त्याचे



निमित्तमात्र व्हायचे आहे (११.३३); ते साऱ्या संकटांतून अर्जुनाचे रक्षण करतील; पण अर्जुन जर अहंकाराने त्यांचे सांगणे ऐकणार नसेल तर खात्रीने त्यामुळे त्याचा नाशच होईल (१८.५८). तो स्वधर्म व कीर्ती गमावून पापाचा भागीदार होईल. सर्व लोक नेहमी त्याची दुष्कीर्ती गात राहतील आणि दुष्कीर्ती तर संभावित माणसाला मरणापेक्षाही मरण होय (२.३३-३४).

म्हणून श्रीकृष्णाने अर्जुनाला कर्मफलाविषयी अनासक्त राहून, पूर्ण निष्ठेने धर्मयुद्धरूपी हे पवित्र कर्तव्य पार पाडण्याचा सल्ला दिला (३.१९). शेवटी त्यांनी हेही सांगितले की, अहंकाराच्या अधीन होऊन 'मी युद्ध करणार नाही' हे अर्जुनाचे म्हणणेही व्यर्थ ठरेल, कारण मोहवश होऊन अर्जुन ते करू इच्छित नाही ते त्याचा क्षत्रिय स्वभावच त्याच्याकडून करून घेईल (१८.५९). वस्तुतः या युद्धातून माघार घेणे हा पर्याय त्याच्याजवळ नाहीच. युद्ध सोडल्यास त्याला मनःशांती मिळणार नाही. मनःशांती केवळ आपले कर्तव्य नीटपणे पार पाडत, मनोमन ईश्वराला शरण गेल्यावरच मिळेल.

आता अर्जुनाचा पूर्णपणे भ्रमनिरास व्हावा यासाठी गीतोपदेशाच्या शेवटी, भगवान श्रीकृष्ण त्याला संपूर्ण गीतोपदेशाचे सार म्हणून दोन श्लोक सांगत आहेत. या दोन श्लोकांच्या जोडीला (श्लोक १८.६५-६६) त्यांना 'माझे परम वचन' असे गौरवपूर्ण शब्दांत उल्लेखिलेले आहे.

**सर्वगुह्यतमं भूयः शृणु मे परमं वचः ।**
**इष्टोऽसि मे दृढमिति ततो वक्ष्यामि ते हितम् ।।६४।।**
**मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ।**
**मामेवैष्यसि सत्यं ते प्रतिजाने प्रियोऽसि मे ।।६५।।**
**सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज ।**
**अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः ।।६६।।**

''सर्व गुह्यातले गुह्य अशी अखेरची एक गोष्ट पुन्हा मी तुला सांगणार आहे, ती ऐक. तू माझा अत्यंत लाडका आहेस म्हणून तुझ्या हिताची ही गोष्ट मी तुला सांगणार आहे.'' ।।६४।।

''केवळ माझ्यातच मन ठेव. माझा भक्त हो. माझे पूजन कर. मला वंदन कर. म्हणजे तू मलाच येऊन मिळशील. हे तुला मी सत्य प्रतिज्ञेने सांगतो. कारण तू माझा आवडता आहेस.'' ।।६५।।

''सर्व धर्म सोडून तू केवळ मला शरण ये. मी तुला सर्व पापांतू मुक्त करीन. तू शोक करू नकोस.'' ।।६६।।

भगवंतांनी निरनिराळ्या वेळी, गूढ तत्त्वज्ञान सांगताना 'गुह्यतमम्', 'राजगुह्यम्' अशा विशेषणांचा वापर केला, पण या सर्व उपदेशांचा उपसंहार करताना, 'सर्वगुह्यतमम्' असे प्रथमच सांगितले. सांगितलेल्या उपदेशांमध्ये सर्वांत अधिक महत्त्वाची ही गुप्त गोष्ट पुन्हा ऐकण्यासाठी भगवंत अर्जुनाला सांगत आहेत. कारण अर्जुन हा त्यांचा सर्वांत आवडता शिष्य, सखा, भक्त... असा सर्वकाही आहे. म्हणूनच त्याच्या हिताची गोष्ट भगवंतांना सांगायची आहे.

नंतरच्या (६५ व्या) श्लोकातील "मन्मना भव" हे भक्तियोगाचे सार आहे. "तू मला तुझे मन-बुद्धी दे" हेच भगवंतांचे मागणे आहे. ज्ञानेश्वर माऊली म्हणतात,

**तूं मन हें मीचि करीं । माझिया भजनीं प्रेम धरीं ।**
**सर्वत्र नमस्कारीं । मज एकातें ।।** (ज्ञानेश्वरी अ.९-५१७)

"तू आपले मन मद्रूप कर. माझ्या भजनाच्या ठिकाणी प्रेम धर आणि सर्व ठिकाणी माझेच स्वरूप आहे असे समजून मला एकालाच नमस्कार कर"... नवव्या अध्यायाच्या ३४ व्या श्लोकातसुद्धा जवळजवळ हाच उपदेश भगवंतांनी दिला होता. भगवंताला सर्वव्यापी, सर्वेश्वर, सर्वशक्तिमान, सर्वज्ञ, सर्वाधार मानून, त्याच्या ठिकाणी दृढ भाव ठेवून, त्यालाच सर्वस्व मानणे व त्याचेच सदोदित चिंतन करणे म्हणजे भगवंतामध्ये मन असणारा होणे.

त्यानंतर 'मद्भक्तो व 'मद्याजी' होऊन केवळ मलाच 'नमस्कार कर' म्हणून भगवंत सांगत आहेत. भगवंताला आपला एकमात्र रक्षणकर्ता (भर्ता), गती, प्रभू, स्वामी, परम आश्रय मानून 'सोऽहं' भावाने त्यालाच शरणागत होणे व त्याच्यावरच अनन्य प्रेम व श्रद्धा ठेवणे म्हणजे त्याचा भक्त होणे होय. साधकाने प्रथम आपला 'अहं' भगवंताला देऊन टाकायचा म्हणजेच "मी त्या भगवंताचा आहे" असे समजून केवळ समर्पित भावनेने, प्रपंचातील सर्व कर्मे निष्काम, सेवाभावनेने भगवंताची पूजा म्हणून करायची म्हणजे 'मद्याजी' होणे होय. या साधनांनी भक्ताला माझी प्राप्ती होईल हे भगवंताचे आश्वासन आहे. अर्जुन भगवंताचा प्रिय भक्त व सखा होता, म्हणून भगवंतांनी त्याला निःशंक करण्यासाठी, ही गोष्ट पुन्हा सत्य प्रतिज्ञेवर सांगितली. नंतरच्या (६६ व्या) श्लोकात भगवंतांनी ही गोष्ट आणखी स्पष्ट करून सांगितली आहे.

हा ६६ वा श्लोक गीतोपदेशाचे सर्वोच्च शिखर मानले जाते. हा 'शरणागती'चा श्लोक आहे. भगवान म्हणतात, "हे अर्जुना! तू साऱ्या धर्मांना सोडून दे आणि फक्त मला शरण ये. मी सांगतो त्याप्रमाणे वाग. मी तुला सर्व पापांपासून मुक्ती देईन. तू इतका शोक का करीत आहेस?"



या महन्मंगल श्लोकावर श्री ज्ञानेश्वर माऊलींनी ८५ ओव्यांतून निरूपण केले आहे. या ओव्यांतून भगवंताच्या मनातील नेमका भाव येथे व्यक्त झाला आहे. त्यातील काही महत्त्वाच्या ओव्या अशा -

**तैसा मी एकवाचूनि काही । मग भिन्न भिन्न आन नाही ।**
**सोऽहं बोधे तयाचा ठायीं । अनन्यु होय ।।१३९७।।**
**पैं आपुलेनि भेदेविण । माझे जाणिजे जे एकपण ।**
**तयाचि नाव शरण । मज येणे गा ।।१३९८।।**
**म्हणौनि घटाचेनि नाशे । गगनी गगन प्रवेशे ।**
**मज शरण येणे तैसें । ऐक्य करी ।।१३९९।।**
**सुवर्णमणि सोनया । ये कल्लोळु जैसा पाणिया ।**
**तैसा धनंजया । शरण ये तू ।।१४००।।**
**हृदया हृदय येक जाले । ये हृदयीचे ते हृदयी घातले ।**
**द्वैत न मोडिता केले । आपणाऐसे अर्जुन ।।१४२१।।**

"त्याप्रमाणे मग मी एकट्यावाचून दुसरे भिन्न भिन्न काहीच नाही. (असे जे माझे स्वरूप) त्याच्या ठिकाणी तोच मी आहे अशा ज्ञानाने अनन्य हो." ।।१३९७।।

"अर्जुना, आपल्याला माझ्याहून भिन्न न मानता जे माझे एकपण जाणावयाचे, त्याचेच नाव मला शरण येणे होय." ।।१३९८।।

"म्हणून (ज्याप्रमाणे) घट फुटल्याने घटाकाश जसे महाकाशात ऐक्याने प्रवेश करते, अशा ऐक्याने मला शरण ये." ।।१३९९।।

"अर्जुना, सोन्याचा मणी जसा सोन्याला शरण येतो, अथवा लाट जशी पाण्याला शरण येते त्याप्रमाणे तू मला अभिन्नत्वाने शरण ये." ।।१४००।।

"तेव्हा आलिंगनाच्या वेळी देवाचे व अर्जुनाचे हृदय एक झाले, देवांनी आपल्या हृदयात असलेला बोध अर्जुनाच्या हृदयात घातला आणि देव व भक्त हे द्वैत न मोडता, देवांनी अर्जुनाला आपल्यासारखे केले." ।।१४२१।।

संपूर्ण शरणागतता हीच सहज भक्ती गीतेने सांगितली आहे. मद्रूप होऊन माझी सेवा करणे हाच खऱ्या भक्तीचा मंत्र आहे हे भगवंताचे सांगणे आहे. मला तुझ्याहून भिन्न न मानता जे माझे एकपण जाणावयाचे तेच मला शरण येणे होय. अद्वैत तत्त्वज्ञान सांगणारा हा श्लोक आहे. श्री ज्ञानेश्वरांनीसुद्धा हेच तत्त्वज्ञान विस्ताराने ज्ञानेश्वरीत मांडले आहे. म्हणून ज्ञानेश्वरीचा प्रवास हा आत्मरूपापासून विश्वात्मक देवापर्यंतचा आहे. घट-घटाकाश, सुवर्णमणी व सोने, लाटा व पाणी या उपमांतून हे ऐक्य कसे एकरूप असते हे ज्ञानेश्वर माऊलींनी समजावले आहे. म्हणून गीता ही वैश्विक आहे. ती केवळ

भारतीयांसाठी नाही. हा जीवनग्रंथ सर्वांसाठी आहे. तो अखिल मानवजातीसाठी आहे.

धर्माविषयी (कर्तव्याचा) नीट निर्णय करू न शकणे हेच अर्जुन दुःखी होण्याचे कारण होय. एकाच परिस्थितीत वेगवेगळ्या दृष्टीतून विचार करताना कर्तव्याविषयीचे निर्णय वेगवेगळे होऊ शकतात. धर्माची प्रतिष्ठापना करायची असेल तर वर्तमान स्थितीत युद्ध करणे अपरिहार्य आहे आणि युद्ध झाल्यास वंशनाश होणे हेही अटळ आहे. हे धर्मयुद्ध आहे म्हणून या युद्धातून माघार घेणे निःसंशय पाप आहे, आणि युद्ध करून आपल्या वंशाचा नाश करणे हेही पाप आहे. तर मग या स्थितीत अर्जुनाने काय करायचे? तो अगदी गोंधळात पडलेला आहे. अशा भांबावलेल्या स्थितीत कर्तव्य आणि अकर्तव्य यांचे विवेचन करणारा सद्‌गुरूच योग्य मार्ग दाखवू शकतो. अर्जुनाला तर स्वतः भगवानच सद्‌गुरूच्या रूपाने मिळाले आहेत. धर्माविषयी त्यांच्यापेक्षा अधिक चांगला निर्णय अन्य कोण देऊ शकतो? आणि भगवंतांनी तर आपले स्पष्ट मत दिले आहे. ते म्हणजे - हे धर्मयुद्ध असल्यामुळे कितीही किंमत चुकवावी लागली तरी, अर्जुनाला हे युद्ध लढलेच पाहिजे. समाजात पसरलेला अधर्म नष्ट करण्यासाठी आणि त्यांच्या जागी धर्माची प्रतिष्ठापना करण्यासाठी आपले पूर्ण योगदान देणे हाच सर्वांत मोठा धर्म होय. आणि अर्जुनाला अस्वस्थ करत असलेली ही जी पाप-पुण्याची गोष्ट आहे तिचा उपायही भगवंतांनी सांगितला आहे. समत्व-योग आत्मसात करून... अनासक्त होऊन... कर्तव्यभावनेने आणि ईश्वराला समर्पित करून... ईश्वराचेच कार्य समजून... कार्य केल्यास, कोणतेही पाप लागण्याचा प्रश्नच उद्‌भवत नाही. अशा प्रकारे भगवंतांनी अगदी स्पष्टपणे अर्जुनाला मार्गदर्शन केले. आता अर्जुनाला फक्त एवढेच करायचे आहे की, कर्तव्याविषयी वेगवेगळ्या लोकांची वेगवेगळी विवेचने (सर्व धर्म) सोडून देऊन केवळ एकमेव भगवंतालाच शरण जावे आणि त्यांनी सांगितलेल्या मार्गाचाच निष्ठेने अवलंब करावा. भगवंत अर्जुनाला सगळ्या पापांपासून मुक्त करतील, हे त्यांचे ठाम आश्वासन आहे.

उपरोक्त विवेचन, युद्धापूर्वी अर्जुनाच्या मनात निर्माण झालेल्या विषाद आणि मोह यांचे भगवंताकडून जे निराकरण झाले त्या दृष्टीने आहे. पण खरे तर, या दिव्य श्लोकात सांगितलेला 'शरणागती'चा उपदेश आपणा सर्वांसाठीच उपयुक्त आहे. अर्जुनाप्रमाणे भगवंत मार्गदर्शन करण्यासाठी आज आपल्यासमोर नाहीत तरीही त्यांच्या वाणीच्या रूपाने गीतोपदेश तर आहे ना! गीतोपदेशाच्या रूपाने स्वतः भगवंतच जणू आपल्यासमोर विराजमान



आहेत. भगवंतांशी कायम जोडलेले राहून (१८.६५), गीतोपदेशानुसार जगणे म्हणजेच 'शरणागती' होय. गुरूला शरण जाणे याचा अर्थ त्यांनी सांगितलेल्या मार्गावरून चालणे हाच होतो. गीतोपदेशाप्रमाणे जगणे म्हणजे जीवन शक्तियुक्त (२.३), सात्त्विक (१८.२६) आणि दिव्य (१०.४१) बनवून जगणे होय. हृदयात प्रेम आणि करुणा घेऊन (१२.१३), सर्व प्राणिमात्रांच्या हितासाठी (५.२५) धडपडणे होय. अनासक्त राहून आपली सगळी कर्तव्ये चांगल्या प्रकारे पार पाडत राहणे होय (३.१९). ज्यांनी आम्हांला जीवन दिले त्या परमात्म्याची आपल्या सत्कर्मांनी पूजा करीत जगणे होय (१८.४५). रोमारोमात ईश्वराच्या संगतीचा अनुभव घेत सदैव कृष्णभावापन्न होऊन जगणे होय ('मद्‌भावम् आगताः' - ४.१०). ईश्वराशी पूर्णपणे जोडले गेलेल्या अशा माणसात ना अहंकार राहात, ना कर्ताभाव (१४.१९). त्या माणसाकडून केली गेलेली सारी कर्मे जणू स्वतः ईश्वरच करतो - भक्त आणि भगवान एकरूपच होऊन जातात (१२.८). हेच सर्वश्रेष्ठ जीवन. प्रत्येक मानवाला हे लाभावे असे भगवंतांना अभिप्रेत आहे. 'शरणागती' या एकाच उपदेशामध्ये संपूर्ण गीतेचे सार आले आहे.

अशा प्रकारे भगवंतांनी गीतेच्या उपदेशाचा उपसंहार केला. नंतर ते म्हणतात -

**इदं ते नातपस्काय नाभक्ताय कदाचन ।**
**न चाशुश्रूषवे वाच्यं न च मां योऽभ्यसूयति ।।६७।।**
**य इमं परमं गुह्यं मद्भक्तेष्वभिधास्यति ।**
**भक्तिं मयि परां कृत्वा मामेवैष्यत्यसंशयः ।।६८।।**
**न च तस्मान्मनुष्येषु कश्चिन्मे प्रियकृत्तमः ।**
**भविता न च मे तस्मादन्यः प्रियतरो भुवि ।।६९।।**
**अध्येष्यते च य इमं धर्म्यं संवादमावयोः ।**
**ज्ञानयज्ञेन तेनाहमिष्टः स्यामिति मे मतिः ।।७०।।**
**श्रद्धावाननसूयश्च शृणुयादपि यो नरः ।**
**सोऽपि मुक्तः शुभाँल्लोकान्प्राप्नुयात्पुण्यकर्मणाम् ।।७१।।**
**कच्चिदेतच्छ्रुतं पार्थ त्वयैकाग्रेण चेतसा ।**
**कच्चिदज्ञानसंमोहः प्रनष्टस्ते धनंजय ।।७२।।**

"हे ज्ञान ज्याचे तप नाही, ज्याची भक्ती नाही आणि ज्याला ऐकण्याची इच्छा नाही तसेच जो माझा द्वेष करतो, त्याला कधीही सांगू नकोस." ।।६७।।

"जो हे अत्यंत गुह्य ज्ञान माझ्या ठिकाणी परम भक्तिभाव ठेवून माझ्या भक्तांना सांगेल, तो मलाच येऊन मिळेल, यात मुळीच शंका नाही." ।।६८।।

"आणि त्याच्यापेक्षा मला आवडती गोष्ट करणारा मनुष्यांत दुसरा कोणीही नाही. इतकेच नव्हे, तर या पृथ्वीवर त्याच्याहून दुसरा मला जास्त आवडता कोणी होणारही नाही." ।।६९।।

"आमच्या दोघांच्या या धर्मसंवादाचा जो कोणी अभ्यास करील, त्याने ज्ञानयज्ञाने माझी पूजा केली, असे मी समजेन." ।।७०।।

"तसेच जो दोष न काढता श्रद्धेने हे ऐकेल, तोसुद्धा पापापासून मुक्त होईल आणि पुण्यकर्मे करणाऱ्या लोकांना मिळणाऱ्या शुभ लोकात जाईल." ।।७१।।

"हे अर्जुना! मी आतापर्यंत सांगितलेले तू एकाग्र चित्ताने ऐकलेस ना? तसेच अज्ञानामुळे तुला जो मोह निर्माण झाला होता तो आता अगदी नष्ट झाला ना?" ।।७२।।

श्री भगवान म्हणतात की, हे पवित्र ज्ञान ज्याचे तप नाही, ज्याची भक्ती नाही, ज्याला ऐकण्याची इच्छा नाही, अशा मनुष्याला देऊ नये. अशा लोकांना ज्ञान देणे म्हणजे कठीण खडकावर बीज पेरल्यासारखे आहे. ते कधीही उगवत नाही.

पण हे गुह्य ज्ञान, हे पवित्र विचार, जो अत्यंत श्रद्धेने, श्रद्धावान भक्तांना सांगेल तो भगवंतांकडे निश्चित येऊन मिळेल. कारण हे पवित्र विचार जो प्रेमपूर्वक इतरांना सांगतो त्याच्याएवढा भगवंतांना आवडणारा दुसरा कोणी या पृथ्वीवर नाही, हा भगवंताचा उद्घोष आहे.

**दुर्जनः सज्जनो भूयात् । सज्जनः शान्तिम् आप्नुयात् ।**
**शान्तो मुच्येत बन्धेभ्यो । मुक्तश्च अन्यान् विमोचयेत् ।।**

"दुर्जनांनी सज्जन बनावे. सज्जनांनी शांती प्राप्त करून घ्यावी. शांती प्राप्त झाल्यानंतर ते कर्मबंधनातून मुक्त होतील. अशा मुक्त पुरुषांनी इतरांनाही मुक्त करावे."

पवित्र विचारांनीच मनुष्याची बुद्धी बदलते. बुद्धी शुद्ध झाली की मन बदलते. एकदा मन बदलले की मग त्याचे संपूर्ण आचरणच बदलते. शक्तिशाली विचार मनुष्याच्या जीवनात परिवर्तन आणतात. म्हणून हे दैवी विचार अज्ञानी, पण जिज्ञासू, श्रद्धाळू, मूढ लोकांना अवश्य सांगावेत. "न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ।" (४.३८) या जगात ज्ञानासारखे पवित्र दुसरे काही नाही. भगवंत व अर्जुन यांच्या संवादाचा जो कोणी अभ्यास करील तो या ज्ञानयज्ञाने माझी पूजाच करतो असे भगवंत म्हणतात. सर्व यज्ञांत ज्ञानयज्ञ



हा श्रेष्ठ व पवित्र यज्ञ आहे. (४.३३) प्राचीन काळी जनकराजाने आपल्या दरबारात हा ज्ञानयज्ञ सतत जागृत ठेवला होता. ऋषी-मुनींना बोलावून, पंडितांच्या सभेमध्ये एखादा विवाद्य विषय ठेवून त्यावर चर्चा घडवायची व त्यातून पवित्र बोधामृत वाटायचे. जी माणसे अध्ययन व अध्यापन करण्यास असमर्थ आहेत, ती याचे श्रद्धापूर्वक श्रवण करूनसुद्धा पापमुक्त होऊन उत्तम लोकांत गती प्राप्त करू शकतात. नवविधा भक्तीमध्ये श्रवणाला प्रथम स्थान दिले आहे.

अशा प्रकारे गीताशास्त्राचे कथन, पठण व श्रवण यांचे माहात्म्य सांगून भगवंतांनी अर्जुनाला सावध केले. आतापर्यंत जो उपदेश केला तो अर्जुनाने एकाग्र चित्ताने ऐकला का? व त्यामुळे त्याचा अज्ञानजनित मोह नाहीसा झाला का? या भगवंताच्या प्रश्नांना कृतज्ञतापूर्वक उत्तर देऊन, अर्जुन आता आपल्या सध्याच्या स्थितीचे वर्णन करीत आहे.

अर्जुन उवाच,

**नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा त्वत्प्रसादान्मयाच्युत ।**
**स्थितोऽस्मि गतसंदेहः करिष्ये वचनं तव ।।७३।।**

"हे अच्युता! तुमच्या प्रसादाने माझा मोह नाहीसा झाला. माझ्या (कर्तव्यधर्माचे) स्मरण मला झाले. आता मी निःसंदेह झालो. मी तुमच्या म्हणण्याप्रमाणे (युद्ध) करीन." ।।७३।।

भगवंताला 'अच्युत' या नावाने संबोधित करून अर्जुनाने श्रीकृष्णाच्या दिव्य स्वरूपाचेच वर्णन केले आहे. श्रीकृष्ण सर्वज्ञ व सर्वशक्तिमान, साक्षात परमात्माच आहेत आणि ते कल्याणाच्या मार्गावरच नेहमी 'अच्युत' म्हणजे अटळ राहणारे आहेत, याची जाणीव अर्जुनाला झाली आहे. अशा भगवंताच्या कृपाप्रसादाने आपला मोहनिरास झाला याची कृतज्ञता अर्जुन प्रकट करीत आहे. अर्जुनाप्रमाणे आपणा सर्वांचीही गीता पठण किंवा श्रवणाची "करिष्ये वचनं तव" हीच फलश्रुती झाली पाहिजे. गीतेच्या विचारांनी निःसंदेह व मोहनिरास झाल्यानंतर त्या विचारानुसार कृती करणे हे आपले कर्तव्य आहे. याचा पक्का बोध अर्जुनाला झाला म्हणून निःसंदिग्धपणे "मी तुमच्या म्हणण्याप्रमाणे कृती करेन" असे अर्जुनाने भगवंताला वचन दिले. अर्जुनाच्या रूपाने तुम्हा-आम्हा सर्वांना, हे विचार प्रत्यक्ष आचरणात आणण्यासाठी हा भगवंताचा उपदेश आहे. गीता हा याचसाठी जीवनग्रंथ आहे. केवळ पारायणाचा हा ग्रंथ नसून जीवन बदलवणारा हा ग्रंथ आहे. आपल्या जीवनाचा सारथी श्रीकृष्ण जर झाला तर हा जीवनरथ आत्मोन्नतीच्या राजरस्त्याने निश्चित जाईल. जीवन कृतार्थ करण्यासाठी या दैवी विचारांची अत्यंत गरज आहे.

गीतेच्या शेवटच्या पाच श्लोकांत, संजय धृतराष्ट्राच्या समोर गीतेचे महत्त्व सांगत आहे. संजय त्यानंतर व्यासाविषयीची कृतज्ञता प्रकट करीत आहे. हा अद्‌भुत रोमांचकारक संवाद ऐकल्यानंतरची ही स्थिती आहे -

**इत्यहं वासुदेवस्य पार्थस्य च महात्मनः ।**
**संवादमिममश्रौषमद्‌भुतं रोमहर्षणम् ।।७४।।**
**व्यासप्रसादाच्छ्रुतवानेतद्‌गुह्यमहं परम् ।**
**योगंयोगेश्वरात्कृष्णात्साक्षात्कथयतः स्वयम् ।।७५।।**
**राजन्संस्मृत्य संस्मृत्य संवादमिमद्‌भुतम् ।**
**केशवार्जुनयोः पुण्यं हृष्यामि च मुहुर्मुहुः ।।७६।।**
**तच्च संस्मृत्य संस्मृत्य रूपमत्यद्‌भुतं हरेः ।**
**विस्मयोमेमहान् राजन् हृष्यामि च पुनः पुनः ।।७७।।**
**यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः ।**
**तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम ।।७८।।**

संजय म्हणाला,

''असा हा भगवान वासुदेव आणि महात्मा अर्जुन यांचा, अंगावर रोमांच उभे करणारा अद्‌भुत संवाद मी ऐकला.'' ।।७४।।

''भगवान योगेश्वर श्रीकृष्ण साक्षात् स्वतः सांगत असता हे अत्यंत गूढ योगशास्त्र व्यासदेवांच्या कृपेमुळे मला ऐकण्याचे भाग्य लाभले.'' ।।७५।।

''हे राजा! श्रीकृष्णार्जुनांच्या या पुण्यप्रद, विलक्षण संवादाची मला पुनःपुन्हा आठवण होते आणि त्याचबरोबर वारंवार हर्षाची कारंजी उसळत आहेत.'' ।।७६।।

''हे राजा! श्रीहरीचे ते अत्यंत विलक्षण अलौकिक विश्वरूप आठवून आठवून मला मोठा विस्मय वाटत आहे आणि वारंवार हर्ष होत आहे.'' ।।७७।।

''जिकडे योगेश्वर श्रीकृष्ण व जिकडे धनुर्धर अर्जुन, तिकडेच श्री, विजय, शाश्वत ऐश्वर्य आणि अढळ नीती असते असे माझे मत आहे.'' ।।७८।।

अर्जुनाला इथे 'महात्मा' असे संबोधिले आहे. कारण त्याचे हृदय स्वच्छ आहे, सरळ आहे, त्याची वृत्ती सात्त्विक आहे. संजय व्यासदेवाविषयी कृतज्ञता प्रकट करून त्यांच्याच कृपेमुळे (म्हणजे दिव्यदृष्टी दिल्यामुळे) मला हा अद्‌भुत संवाद ऐकावयास मिळाला याबद्दल स्वतःला धन्य समजत आहे. प्रत्यक्ष भगवंताच्या मुखारविंदातून निघालेले शब्द ऐकताना, पुन्हा त्याचे स्मरण करताना संजयाचे हृदय भावविभोर होत आहे. शेवटी अत्यंत निर्भयतेने धृतराष्ट्राला या युद्धाचे फलित त्याने सांगितले. निःसंदिग्ध शब्दात संजयाने युद्धाच्या परिणामाचे भाकीत सांगून टाकले. ज्या ठिकाणी योगेश्वर कृष्ण असेल, जिथे गांडीव धनुष्य धारण करणारा अर्जुन असेल, तेथेच श्री,



विजय, विभूती आणि अचल नीती राहणार, असे सांगून युद्धात पांडवांचा विजय नक्की होईल हे भविष्य सुनावले. अर्जुनासारखे दैवी गुण व भगवंताचे अधिष्ठान जिथे असते तिथेच सफलता, विजय, ऐश्वर्य, अढळ नीती या सर्व गोष्टी असतात. गीतेची वाणी ही परावाणी आहे. भगवान श्रीकृष्णाच्या या वाणीने सर्वांचे जीवन सफल, कृतार्थ, आनंदित होवो हीच त्या योगेश्वराच्या चरणी प्रार्थना!!

**।। श्रीकृष्णार्पणमस्तु ।।**

## ।। श्रीमद्भगवद्गीता ।।

## ।। गौरव ।।

गीता भगवंतांनी गायिलेले मधुर गीत आहे. ते जीवन संगीत आहे. जीवन समृद्ध, जागृत करणारा पावन मंत्र आहे. या गीता-मंत्राने लाखो अर्जुनांना धर्मक्षेत्र, कर्मक्षेत्र, जीवनक्षेत्र, यात श्रेयाचा, विजयाचा व स्वधर्माचा मार्ग दाखविला आहे. म्हणून गीता मंत्र आहे. गीता ग्रंथ आहे. गीता पंथ आहे. गीता संत आहे. आदि, अनन्त आहे.

गीता रागी, विरागी, ब्रह्मचारी, संन्यासी, गृहस्थ, वानप्रस्थ, स्त्री-पुरुष या सर्वांसाठी पाथेय आहे.

आत्मगौरव प्राप्त करण्यासाठी, प्रत्येकाच्या मनात, बुद्धीत गीता-विचार प्रस्थापित झाले पाहिजेत.

म्हणून गीता जीवनग्रंथ आहे. जीवनातील समस्यांचे निराकरण करणारी संजीवनी आहे.



## संदर्भग्रंथसूची


१. विनोबा - गीता-प्रवचने

२. लोकमान्य टिळक : गीतारहस्य

३. शंकर वा. दांडेकर : सार्थ ज्ञानेश्वरी

४. गीता प्रेस-गोरखपूर : श्रीमद्भगवद्गीता

५. गीतामृतम् : सद्विचार दर्शन, मुंबई

६. आचार्य सुधांशुजी : श्रीमद्भगवद्गीता

७. एस् राधाकृष्णन् : दि भगवद्गीता

८. भगवान श्री शंकराचार्य : गीता

सर्वांसाठी

# गीता

एक जीवनग्रंथ

भाग-५



## लेखक - परिचय


| | | |
|---|---|---|
| **नाव** | : | प्रा. दत्तात्रय नारायण दुभाषी |
| **जन्म** | : | १९ जानेवारी १९४१ बेळगांव |
| **शिक्षण** | : | १) एम. ए. (इंग्रजी - संस्कृत)<br>२) एम. ए. (मराठी) |
| **व्यवसाय** | : | पत्रकार व माध्यमिक शिक्षक म्हणून १० वर्षे व महाविद्यालयीन प्राध्यापक म्हणून ३० वर्षे अशी एकूण ४० वर्षे सेवा. गोपाळकृष्ण गोखले कॉलेज, कोल्हापूर येथून इंग्रजी विभागप्रमुख म्हणून निवृत्त. |
| **छंद व आवड** | : | • सतत भ्रमण - ५ वेळा अमेरिका-कॅनडा येथे प्रदीर्घ वास्तव्य. युरोप-मिडलईस्ट इ. ठिकाणचा प्रवास.<br>• वक्तृत्व - नाट्य - लेखन यांच्या विशेष आवडीमुळे वर्तमानपत्रे व मासिकांतून अनेक विषयांवर व्याख्याने व लेखन.<br>• निसर्गात पदभ्रमणाची विशेष आवड.<br>• योग-प्राणायाम यावर प्रबोधन - व्याख्याने व प्रात्यक्षिके. |
| **सामाजिक कार्य** | : | • श्री ज्ञानेश्वरी, तुकाराम गाथा अशा संतसाहित्यावर व भगवद्गीतेवर गेली १५ वर्षे सतत प्रवचने व व्याख्याने यातून समाजप्रबोधन.<br>• गीता व ज्ञानेश्वरी यावरील लेखमाला प्रसिद्ध.<br>• अध्यात्म व तत्त्वज्ञान याचा प्रचार व प्रसार हेच जीवनध्येय |
| **संपर्क** | : | २४६ ए/ई, रत्नोदय सोसायटी, नागाळा पार्क, कोल्हापूर. ✆ : ०२३१-६५१०४४ |